# ढासळलेले बुरूज

लेखक

प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

१५ मार्च १९४०

---

किंमत १-९-०

# सरदेसाई यांचें साहित्य

## प्रकाशित

१ कल्पवृक्षांच्या छायेंत (कथासंग्रह)
२ सागराच्या लाटा ,,
३ वादळांतील नौका ,,
४ ढासळलेले बुरूज ,,



## अप्रकाशित

१ विटाळलेली देवता (कादंबरी)
२ निळें आकाश ,,
३ फिरंगी द्राक्षें (कथासंग्रह)
४ अंधारांतील वाटाडे ,,

## आमचें प्रकाशन



## आगामी प्रकाशन

# प्रादेशिक व्यक्तित्व

काश्मीर, कामरूप आणि केरळ हीं हिंदुस्थानच्या त्रिकोणाच्या तीन टोकांचीं सौंदर्यस्थळें आहेत. निसर्गाच्या वैभवाचें दर्शन करून आपल्या डोळ्यांचें आणि हृदयांतील काव्यपिपासेचें पारणें फेडूं पाहणारे विश्वप्रवासी हिंदुस्थानांत आले म्हणजे हीं तिन्ही स्थानें पाहून घेण्याची किती तरी उत्कंठा दाखवितात. पण हिंदुस्थानच्या हृदय-स्थानीं असलेले गोमंतक नैसर्गिक वैभवाच्या बाबतींत वरील तिन्ही प्रदेशांहून यत्किंचित्‌हि कमी नाहीं. रामघाट, तिनअीघाट, चोरल्याचा घाट यांसारख्या घाटांची भीषण शोभा कोणाहि निसर्गभक्ताला वेड लावल्यावांचून राहणार नाहीं. आणि काळी नदींतून निघणारा दूधसागराचा धबधबा श्री. बोरकरांनाच काय, पण सामान्य कोटीच्या कवीला देखील आपल्यासारखेंच अुत्तुंग–रमणीय काव्य करण्याची प्रेरणा देअील.

गोमंतक म्हणजे चराचर विश्वाला दिलेलें सदाचें आमंत्रण. यात्रे-साठीं या किंवा स्थायी वास्तव्य करण्यासाठीं; मनुष्य या किंवा पक्षुपक्षी या–' येथें झाली नाहीं कोणाची निरास, आल्या याचकास कृपेविषीं । ' गोव्यांत संतमहंतांनीं वास्तव्य केलें आहे; आणि

दादाराणा, दीपाराणासारख्या शूरवीरांनीं देखील वास्तव्य केलें आहे. गोव्यांत माणसेंहि राहतात आणि भूत, प्रेत, देवचार, समंध देखील राहतात. वाघ आणि गवे राहतात त्याचप्रमाणें फुरसीं आणि मणियारें देखील राहतात. अंबोतीसारखी गरीब भाजी गोव्यांत आहे आणि माडपोफळांसारखें विशालसुंदर वृक्ष देखील गोव्यांत आहेत. साधक आणि शिकारी दोघांनाहि गोव्यांतील स्थानांचें आकर्षण वाटते. आंबे आणि फणस, नारळ आणि काजू, अमसोल आणि मुरटे गोव्यांतील सर्व कांहीं रसाळ असतें.

आणि गोव्यांतील भाषा? ती तर प्रेमळपणांत आणि माधुर्यांत जगांतील कोणत्याहि भाषेला हार जाणार नाहीं. मला जरी कोंकणी बोलण्या अितकें येत नसलें तरी मृत्यूच्या घटकेला जर कोंकणी शब्द कानीं पडले, तर मला वाटतें क्षणभर मरावयाचें विसरून कोंकणीचें बोल अैकत राहीन.

मंगेश आणि शांतादुर्गा, महालक्ष्मी आणि नागेश अित्यादि आमचे कुळदेव गोव्यांतच असल्यामुळें अगदी लहानपणापासून गोवें म्हणजे देवभूमि अशी भावना मनांत दृढ होऊन गेली आहे.

पिढ्यान्‌पिढ्या शाकाहारी असल्यामुळें गोव्यांतील अितर खाद्य-पदार्थांचें— समुद्रसृष्टीचें—आकर्षण जरी कधीं वाटलें नाहीं, तरीहि गोव्यांतील मोगरीच्या कळ्यांसारखा भात, लाह्यासारखी पेज, खोब-ऱ्याची कढी, काजूची आमटी आणि कोंवळ्या आंब्यांचें लोणचें यांचें भोजन करून आणि वर त्रिफळांनीं सुवासिक केलेलें आमसोलांचें सार प्याल्यानें जी तृप्ति होत असे तिचें स्मरण आजहि ताजें आहे.

गोव्यांत दूधदुभत्याची चंगळ नाहीं हें खरें, पण ज्याला खोबऱ्याचें मुटेल मिळालें तो तुपाची आठवण काय म्हणून काढील? आणि नारळाची मातोश्री गोड पाणी आणि खोबऱ्याचा आपरस देण्यास

तयार असतांना गौमातेलाच पिळण्याचा आग्रह मनुष्यानें कां धरावा? आडसराचें पाणी हें तर अमृततपेय आहेच; पण मुरमाच्या चऱ्यांतून निघणारें तिकडील स्फटिकासारखें स्वच्छ पाणी कमी गोड नसतें.

अशा गोव्यांतील लोकजीवन तितकेंच काव्यमय असणार यांत शंका नाहीं. पण श्रीमंतांचीं मुलें ज्याप्रमाणें जीवनकलहामध्यें फारशीं कणखर अथवा पराक्रमी दिसत नाहीत, त्याचप्रमाणें निसर्गाच्या समृद्धीमध्यें वाढलेला मनुष्यहि कांहींसा सुखासीन, चालढकल करणारा आणि गाफल असतो. गोव्यांतील स्थिति या बाबतींत कांहींशी विचित्र आहे. फळांफुलांच्या बाबतींत जी भूमि अत्यंत रसाळ आहे तीच धान्याच्या बाबतींत बरीचशी कंजूष दिसते. कोंकणांत 'सदा पीक आणि सदा भीक' ही जुनी म्हण फारशी खोटी नाहीं. वनस्पति, अिमारती लांकडें, खनिज पदार्थ, तरतऱ्हेचे मेवे आणि समुद्रसंपत्ति यथेच्छ असून देखील कोंकणांतील लोकांना स्वदेश सोडून बाहेर जावें लागतें.

अशा विचित्र स्थितीमुळे कांहीं लोक अल्पसंतोषी आणि अैदी दिसतात; तर कांहीं लोक तरतरीत आणि रजोगुणी असतात. कला, रसिकता त्यांच्यांत असते पण तिचें रूपांतर विलासितेंत होण्याला फारसा वेळ लागत नाहीं.

कसेंहि असो, गोव्यांतील जीवन अेका बाजूनें अस्थिर तर दुसऱ्या बाजूनें अप्रगतिशील अशा प्रकारचें आहे.

गोव्यांतील हिंदूंचीं मंदिरें आणि किरिस्तांवांच्या अिगरज्या कितीहि सुंदर असल्या आणि आसपासच्या वनश्रीमध्यें जरी अगदीं मिसळून जात असल्या, तरी गोव्यांतील जीवनांत आतां मेळ राहिलेला दिसत नाहीं. गोव्याचा आत्मा अस्वस्थ आहे; त्याचें कांहीं तरी चुकलेलें आहे; त्याला कांहीं तरी करून दाखवावयाचें आहे; त्याला आपली

सृष्टिनिष्ठा आणि परंपरापूजा अेकाअेकीं सोडून देऊन नवनिर्मिति करावयाची आहे, आणि जगाला दिपवावयाचें आहे. गोव्याबद्दल दयाहि वाटते आणि आदर व अभिमानहि वाटतो; गोव्याचा हेवा तर नेहमींच वाटतो.

अेवढें खरें, कीं अितर कोणत्याहि प्रांतापेक्षां गोव्याचें वैशिष्ट्य सहज डोळ्यांत भरण्यासारखें आहे. अशा या गोव्याच्या जीवन-परिवर्तनाच्या संधिकाळीं तेथील जुन्या जगाचीं हीं छायाचित्रें अथवा प्रेमाचित्रें विशेष मोहक वाटणें स्वाभाविक आहे. ज्यानें गोव्याचें मधून मधून दर्शन घेअून आपली गोवापरिचयाची भूक वाढवूनच घेतली आहे, त्याला तर 'ढासळलेले बुरुज' हा कथासंग्रह विशेषच आकर्षक वाटणार. लेखकानें या गोष्टींमध्यें सर्व प्रकारची विविधता साधून देखील सर्वत्र वातावरणाची अेकरूपता संभाळलेली आहे. प्रादेशिक कथा कशा असाव्यात म्हणून जर कोणी विचारलें तर या ढासळ-लेल्या बुरुजांकडे बोट दाखवितां येईल.

गेल्या दहा-वीस वर्षांत मराठीच्या लेखनशैलीनें चांगलीच प्रगति केली आहे आणि अेकमेकांची स्पर्धा करूं शकतील असे अनेक गद्य-स्वामी मराठीची अहर्निश सेवा करूं लागले आहेत, ही आनंदाची गोष्ट आहे. प्रस्तुत कथा-संग्रहावरून पाहतां श्री. सरदेसाअी हे देखील मराठीचे चांगलेच सिद्धहस्त लेखक आहेत. ज्याप्रमाणें माशांना पाण्यांत कोणत्याहि दिशेनें पोहण्याची अडचण वाटत नाहीं, त्याचप्रमाणें सरदेसाअींनादेखील कसलाहि प्रसंग, कोणतेंहि दृश्य, कसलीहि कल्पना आणि कोणताहि भाव व्यक्त करतांना सांकडें पडलेलें दिसत नाहीं. त्यांच्या भाषेंत कोठेंहि कृत्रिमता नाहीं आणि महाराष्ट्रसुलभ शाब्दिक कोट्याहि नाहींत. त्यांची पारदर्शक शैली, साधीं वळणें घेत घेत, कसलीहि घाअी न करतां पुढें जात असते.

यामुळें अशी आशा वाटते, कीं ती यथाकाळीं साहित्यसागराला जाऊन मिळेलच.

प्रादेशिक कथा लिहिणारांना स्वतःच्या लेखनांत प्रादेशिक बोलीची रेलचेल करण्याचा मोह होणें स्वाभाविक आहे. तसें केल्यानें प्रादेशिक वातावरण आणि तेथील हवेंतील दर्प ताबडतोब वठवतां येतात हें खरें; पण रसनिष्पत्तीच्या दृष्टीनें हा प्रकार बराचसा महाग पडतो, कारण वाचकाचा जर प्रादेशिक बोलीशीं पुरेसा परिचय नसला तर क्षणोक्षणीं ठेचाळल्यासारखें होऊन एकसारखी रसहानि होऊं लागते. सर गिब्बी ( Sir Gibbie ) सारखी असाधारण सुंदर कादंबरी वाचत असतांना तींत स्कॉटिश शब्द आणि वाक्प्रचार जागजागीं आढळल्यानें कसा विरस होतो याचा अनुभव अनेक वाचकांना असेलच

श्री. सरदेसाईंनीं उच्च अभिरुचि आणि सहानुभूति वापरून प्रस्तुत कथासंग्रहांत कोंकणीची रेलचेल करण्याच्या बाबतींत चांगला संयम दाखविला आहे.

आणि त्याऐवजीं मराठींतच कोंकणी शैलीच्या उपमा वापरून आणि कोंकणीचे वाक्प्रचार मराठींत आणून त्यांनीं प्रादेशिक वातावरण साधलेलें आहे. या प्रकारानें मराठी समृद्ध होऊन मराठीचें क्षेत्रहि वाढीस लागेल.

* * *

सज्जन असो किंवा दुर्जन असो, कुलवान् असो किंवा बंडखोर असो, प्रत्येकापुढें स्वतःच्या वागण्यासंबंधानें अेक स्वतःच निर्माण केलेला आदर्श असतो. त्या आदर्शाप्रमाणें वागल्यानें त्याला समाधान वाटत असतें आणि तसें न वागलें असतां तो स्वतःच्याच नजरेंतून उतरतो. त्या आदर्शाला किंवा स्वतःच्या आवडीला म्हणा वाटल्यास–

H.G. Wellsनें persona असें नांव दिलें आहे. आपण त्याला थोड्याशा व्यापक अर्थानें 'स्वधर्म' असें म्हणूं. कारण प्रत्येकानें कसें वागावें हें जर शास्त्रांनींच ठरविलें तर त्याला स्वधर्म कसें म्हणतां येअील? तो शास्त्रानें ठरविलेला व्यक्तिधर्म, वर्णधर्म किंवा वर्गधर्म झाला असें फार तर म्हणतां येअील. खरा स्वधर्म शास्त्रादि गोष्टींचें परिशीलन करून किंवा न करून शेवटीं व्यक्तीच ठरवीत असते.

जुन्या काळीं जीवन-कलह हल्लींच्या अितका विषम नसे; आणि जीवनगति देखील हल्लींच्या अितकी द्रुत नसे. यामुळें जुन्या काळीं स्वधर्मांचे किंवा परसोन्याचे प्रकारहि विविध किंवा तऱ्हेवाअीक असत. असले 'परसोना' बाळगून जीवन सुखावह होत असे किंवा नाहीं अथवा हे सर्व 'परसोना' प्रगतीला साधक होते किंवा बाधक हा प्रश्न बाजूला ठेवून केवळ मनुष्याच्या अभिरुचीचे प्रकार म्हणूनच त्यांच्याकडे पाहिलें असतां ते किती तरी काव्यमय वाटूं लागतात आणि आपल्या सहानुभूतींचे ते अधिकारीहि बनतात. लघुकथा-लेखकाला आणि कादंबरीकाराला अशा या 'परसोना'मधून आपल्या साहित्यनिर्मितीला चांगलाच मसाला मिळतो. आणि वाचकांना आपल्या सहानुभूतीचा आणि समजूतशक्तीचा विकास करण्यास अुत्तम वाव मिळतो. 'ढासळलेले बुरूज' हा कथासंग्रह या दृष्टीनें वाचकांना सविशेष आकर्षक आणि बोधक वाटेल.

'सह्याद्रीच्या पायथ्याशीं' हा श्री. सुखठणकर यांचा संग्रह वाचल्या-नंतर पुष्कळ वर्षांनीं प्रस्तुत संग्रह वाचावयास मिळाल्यामुळें पुन्हा अेकदां जुन्या काळच्या गोव्याची यात्रा केल्याचा आनंद वाटला; आणि अशी यात्रा घडविणाऱ्या लेखक-प्रकाशकांना धन्यवाद देण्याची अिच्छा झाली.

* * *

कलाकाराचा धर्म नीतिबोध करण्याचा नसून सहानुभूति अुत्पन्न करण्याचा आहे ही गोष्ट खरी आहे. कलाकार कोणाला वाअीटहि म्हणणार नाही आणि कोणाला बरेंहि म्हणणार नाहीं. तो मोठ्या युक्तीनें वस्तुस्थिति जशी असेल तशी चित्रित करतो. पुष्कळदां असेल तशी न मांडतां स्वतःच्या चित्रणकलेला मानवेल अथवा पोषक होतील असे फेरफार तींत करतो. कसेंहि असले तरी त्यानें रुजू केलेलें चित्र खरेंखुरें आहे अशी प्रचीति त्यानें अुत्पन्न केली पाहिजे. असा हा मनाला पटणारा किंवा मनांत ठिबणारा खरेपणा अुत्पन्न करण्यासाठीं लेखक वस्तुस्थितीमध्यें बारीक-सारीक किंवा ढळढळीत फेरफार करतो. तो त्याचा हक्क आहे. पण शेवटीं त्याची कला कितपत साधली आहे तें शेवटीं वाचकांच्या रसिकतेप्रमाणेंच ठरत असतें.

'मोडलेला माड' या गोष्टींत वर्णिलेला प्रसंग खरोखर घडला असल्यास नवल नाहीं; पण वाचकांना तो पटण्याजोगा नाहीं. किती तरी स्त्रियांना स्वतःच्या पतीसंबंधानें निष्कारण शंका वाटत असते. त्या युक्ति-प्रयुक्तीनें नवऱ्याची कसोटी करीत असतात आणि त्याची निष्ठा पडताळून पाहत असतात. पण पत्नीचें नवऱ्याच्या नांवचें अेक बनावटी पत्र तयार करून अेका कलावंतिणीला आपल्या घरीं बोलावून आणणें खरें वाटत नाहीं. आणि पत्नीच्या अशा वर्तनानें पतीच्या मनावर केवढाहि मोठा आघात झाला तरी तो आपल्या मुलांविषयींचें आपलें कर्तव्य विसरून कलावंतिणीला बरोबर घेअून राहील हे संभवनीय वाटत नाहीं; यामुळें तशा प्रकारची शंका मनांत येतांच गोष्टीच्या संसारांत माती कालविली जाते.

याच्या अुलट 'गुरवाचें रक्त' ही गोष्ट हल्लींच्या प्रत्यक्ष सृष्टींत जरी असंभाव्य वाटली तरी ती कथासृष्टींत अगदीं खरी वाटण्याअितक्या सुंदर रीतीनें रेखाटलेली आहे.

सर्वच वाचकांना अेकाच प्रकारें बरेंवाईट आणि खरेंखोटें वाटत असतें असें नाहीं. पण कलाकार ज्याप्रमाणें आपल्या आंतरिक 'परसोना'च्या संतोषासाठीं कलाकृति निर्माण करतो त्याचप्रमाणें वाचकालाहि स्वतःच्या योग्यायोग्यतेच्या कसोटीप्रमाणें अभिप्राय द्यावयाचा असतो. जी स्थिति कलाकृतीची तीच विवेचनाची आणि प्रस्थापनेची. शेवटीं पंचपरमेश्वराला जें पटेल तेंच खरें.

* * *

खरें म्हटलें तर लेखक-प्रकाशकांनीं गोव्यांतीलच अेखाद्या रसिका-ची प्रस्तावना या पुस्तकास जोडावयास पाहिजे होती.

—पण तो त्यांचा प्रश्न आहे. आपल्याला हें पुस्तक फार आवडलें. आणि याच्या वाचनानें गोव्याची अेक मानसिक यात्रा करण्याचा आनंद मिळाला अेवढें आपल्याला बस आहे.

कलकत्ता,<br>४-३-४०.

काका कालेलकर.

२ ]

# मायेचा वारसा

दुपारची वेळ. मला बाहेर कुणी तरी शोधीत आहे, असें मुलीनें सांगितलें. मी अजून जेवलो नव्हतों; पण तसाच बाहेर आलों. कुणी तरी कुळवाडी माझी 'कुळया'ची पडित जमीन वसविण्याच्या इच्छेनें तर आला नसेल ना, अशी कल्पना माझ्या मनांत येऊन गेली.

मी बाहेर आलों. एक म्हातारा भटजी माझ्या दृष्टीस पडला. कां कुणाला ठाऊक, मला असें वाटलें, कीं यानें माझ्याकडे जमिनीची मागणी केली तर किती छान होईल! मातृवियोगानें तळमळणाऱ्या मुलासारखीच मला त्याची मुद्रा दिसली. ती जमीन जशी वैराण अन् भयाण तसाच हाहि वैराण अन् भयाण! कसली तरी तळमळ, कसला तरी ध्यास—त्याच्या त्या केविलवाण्या नजरेंत तरळत होता. रुंद हाडापेराची त्याची ती कणखर काठी किंचित् वाकलेली दिसत होती. केस पिकलेले होते; परंतु कोणत्या तरी प्रबल मानसिक शक्तींचा विकास

त्याच्या देहांत अतिशय झाला असून तो आपल्या वार्धक्यावर विजय मिळवीत आहे असें पाहणाऱ्याला वाटत होतें. कोणत्या तरी उच्च वेडाच्या मागे लागून कंगाल झालेल्या माणसाच्या मुद्रेवर जी अंतर्मुख तादात्म्याची, भोगपराङ्मुखतेची छटा चमकते, ती बऱ्याच प्रमाणांत त्याच्या तोंडावर झळकत होती.

त्यानें मला नमस्कार केला. मी त्याला आंत आणून बसवीत विचारलें,

" काय, कुठून आलांत आपण? माझ्याकडे कांही काम होतं का?"

" मी आतांच 'कुळ्या'हून आलो; अन् माझं काम तुमच्याचकडे आहे."

" आपलं जेवण वगैरे झालं नसेल. आधी आपण जेवून घेऊं, व नंतर सावकाश बोलत बसूं."

" तसं नको, आपल्याकडे मला कांही महत्त्वाचं बोलायचं आहे. तें बोलल्याशिवाय मला घास चालवयाचा नाही."

" मग तसंच करूं; बरं पण, आपलं काम तर मला सांगा."

" माझं काम...पण तसं पाहिलं तर, ते तुमचंहि काम आहे. तुम्ही तें खात्रीनं कराल अशी आशा वाटत असल्यामुळं मी एथवर उपाशी चालत आलों आहे. तुमची 'कुळ्या'ची जमीन आतांच पाहून आलो."

" खरंच? तिची लागवड करण्याचा तुमचा विचार आहे वाटतं?"

" हो, तुमची जमीन मला हवी आहे."

अहाहा! आत्मविश्वासानें उच्चारलेले त्या कंगाल माणसाचे ते शब्द मला किती स्फूर्तिदायक वाटले! लोकांना नको म्हणून टाकलेली माझी काळी-सावळी गरीब जमीन! तिला हा इसम मागणी घालते

आहे आणि तीहि सन्मानपूर्वक! माझी जमीन धन्य की मी धन्य माझें हृदय आनंदानें नाचूं लागलें! मी त्याला आवरीत म्हटलें,

"तुम्हांला पसंत पडली ना ती जमीन?"

"कृष्णबाबा, जीव ओवाळून टाकावा तुमच्या जमिनीवरून! किती आम्ही दुष्ट! तुमची जमीन म्हणजे मधानं भरलेलं मोहोळ! पण ते आमच्या लोकांना नको आहे! तिथं आम्ही ढुंकूनहि पाहत नाहीं."

"तिथं पीक काढायचं तुम्हीं निश्चित ठरवलं आहे काय?"

"अगदीं निश्चित. आज महिनाभर मी सगळीकडे शोधीत होतो; पण जें मिळत नव्हतं, तें मला इथं मिळालं आहे."

"पण तथील अडचणी तुम्हीं लक्षांत घेतल्या आहेत का?— नाहीं तर आज कामाला लागाल, अन् थोड्याच दिवसांनीं कंटाळून निघून जाल."

"तसं कसं होईल? तुम्हांला वाटतं का, की मी हा निश्चय उडत उडत केला आहे? आज दोन-तीन दिवस मी तुमच्या जमिनीचा अभ्यास करीत होतो."

"मग तिथल्या अडचणी तुम्हांला माहीत झाल्या ना?"

"हो. तिथं हिंवतापाचं प्राबल्य आहे, जवळपास पाणी नाहीं, लोकांची वस्ती नाहीं, पीक काढलं तरी जनावरांची भीति आहे, या सगळ्या अडचणी मी पाहून आलों आहे."

"अन् असं असूनहि तुम्ही ती जमीन वसवूं इच्छितां?"

"हो. तुम्हांला मी दर वर्षाला खंड म्हणून काय देऊं तें सांगा."

"हें पहा भटजी, तुम्ही वर्षभर कांही देऊं नका. तुम्हीं जमीन नुसती लागवडीला आणली, तरी मी माझं मोठंच कार्य झालं असं समजेन. तुमचा खंड मला नको आहे. किती तरी कुळवाड्यांना माझी

जमीन टाकाऊ ठरवली होती. त्याच जमिनीबद्दल मी तुमच्याकडून सुरुवातीलाच खंड घेणं मला बरं दिसत नाहीं."

" तुमची जमीन टाकाऊ? कोण करंटे असं म्हणत होते? तुमची जमीन म्हणजे सोन्याची खाण आहे. जमीन ओळखायला देखील भाग्य लागतं महाराजा! तुमच्या त्या सुपीक जमिनीचा फायदा घेऊन मीं तुम्हांला कांहींहि देऊं नये हें कसं शक्य होईल?"

" असं असेल तर तुम्हांला योग्य वाटेल तें मला द्या. पण कांहीं न दिलं तरी चालेल. जमीन चांगली लागवडीला यावी एवढीच माझी इच्छा. तेवढी तुम्हीं पुरवली तरी मी तुम्हांला धन्यवाद देईन."

" या वर्षी मी तुम्हांला दोनशें रुपये देईन. जास्त दिले असते; परंतु नवीनच वर्ष असल्यामुळं सुरुवातीला बरंच काम करावं लागेल."

" माझ्या जमिनीला तुमच्यासारखा माणूस लाभणार हेंच माझं भाग्य! तुम्ही देणार असलेले पैसे मी जमिनीच्या ऊर्जितावस्थेसाठींच मोडीन. पण मला एक सांगा, इतक्या म्हातारपणीं तुम्ही जमिनीच्या लागवडीसारखं कठीण काम करूं शकाल का?"

" तुम्हांला खरंच वाटतं का, कीं मी म्हातारा आहें? माझे केस पिकले आहेत, माझी साठी उलटली आहे, हें खरं; परंतु पंचवीस वर्षांच्या जवानाची हिंमत माझ्या अंगीं आहे. तुम्हांला आश्चर्य वाटेल, पण भूमातेच्या सान्निध्यांत माझा सगळा जन्म गेल्यामुळं माझ्या शक्तीला अजून म्हातारपण नाहीं आलं! जी झाडं मी लावलीं अन् वाढवलीं, त्यांच्या जीवनाचा, त्यांच्या तारुण्याचा माझ्या मनावर, माझ्या देहावर एवढा परिणाम झालेला आहे; मला अजून वाटतं, की तुमच्या त्या खरखीत जमिनीची एका वर्षांत मी चांगली बाग करून सोडीन! आज माझ्याबरोबर यायला तुम्हांला सवड आहे का? मी

तुम्हांला माझी योजना सांगणार होतों. तुम्ही मला वेडा ठरविणार! पण माझं वेड ऐकून घेतल्यानंतर तुम्हांला खात्रीनं समाधान वाटेल. कारण माझ्याप्रमाणंच जमिनीचीं दुःखं तुम्हांलाहि कळतात."

"हो; अवश्य येईन. संध्याकाळच्या गाडीनं आपण जाऊं."

भटजीला आनंद झाला. आपली इच्छा पुरी होत असल्याचें पाहून तो समाधानानें माझ्याबरोबर जेवला.

* * *

सांवर्डेच्या स्टेशनवर तीनच्या गाडींत आम्हीं चढलों. 'कुळ्या'ला पोंचायला आम्हांला तासभर लागणार होता. एवढ्या अवधींत आम्ही किती तरी बोललों! माझी जमीन येणाऱ्या जाणाऱ्या थोडथोडक्या इसमांनीं का पाहिली असेल! पण ती वसवण्याची बुद्धि कुणालाहि झाली नाहीं. आणि हा म्हातारा भटजी कुठचा कुणाला ठाऊक; त्या वैराण भूमीला भुलतो काय, अन् माझ्याकडे येऊन मला पैसे देण्याचे कबूल करून तिला मागणी घालतो काय, सगळेंच विचित्र!

गाडी भयानक आवाज काढीत जात होती. पिकलेली शेतें, पाण्यानें भरलेल्या नद्या, वृक्षराजीनीं सजलेले डोंगर आणि माडांच्या विस्तीर्ण राया भराभर मागें पडत होत्या. दूरवर मध्येंच समुद्रकिनाऱ्याचें एखादें दृश्य दिसून थोड्या वेळानें तें अदृश्य होई.

"भटजी, तुमचं नांव काय तें तुम्ही अजून सांगितलं नाहीं?" भटजींची विचारतंद्री मोडण्याकरितां मीं म्हटलें.

"महाराज, माझ्यासारख्या दरिद्री माणसाचं नांवगांव कशाला विचारतां! नांवगांव सांगण्यांत भूषण असलं, तर तें सांगायचं ना?"

"भटजी, तुमची इच्छा नसली तर सांगूं नका."

"तसं कसं होईल? तुम्ही एवढ्या उत्सुकतेनं विचारतां; मग

तुमच्या मनाचा विरस कसा करूं? सहानुभूतीनं चौकशी करणारीं माणसं तरी आतां कुठं सापडतात? एका जिव्हाळ्याच्या गोष्टीमुळं तुमचा-माझा संबंध येत आहे, तेव्हां माझी सगळी हकीगत तुम्हांला कळलेली बरी."

त्यानें कनवटीला लावलेली तपकिरीची डबी काढून ती उघडली, एक चिमूट मारून ती नाकांत कोंबली व नंतर तो म्हणाला,

" भूमातेची आम्ही लेंकरं! पण तिला आतां ओळखतो कोण? आतां जमीन कुणाला हवी? प्रत्येकाला सरकारी नोकरीची तळमळ! प्रत्येकजण घरच्या सोन्यासारख्या जमिनी पडंग टाकून परक्यांकडे भिकेची याचना करीत असलेला दिसतो. तुम्ही कुठल्याहि भाटांतून फिरा. तुम्हांला काय दिसून येईल? बापुडवाणे माड भिकाऱ्याप्रमाणं उभे आहेत. बिचाऱ्यांच्या मुळांना कुदळ लागल्याम किती तरी वर्षं लोटलीं असतील! तुम्ही आम्ही बामणलोक पूर्वी स्वतःच्या हातांनीं नांगर धरीत असूं आणि जमिनी पेरीत असूं. आज सगळीकडे खरखाट! जमिनीवर जो मनुष्य राहिला त्याला जमीन उपाशी ठेवीत नाहीं. तुम्ही कुणबी लोकांना पाहिलं आहे का? जमिनीशिवाय ते आणखी कुणालाहि ओळखत नाहींत. दिवसरात्र जमिनीची सेवा! नाचणे, पाकळ, मिरची संसाराला जें जें लागेल ते तें, ते डोंगरमाथ्यावर पिकवतात, अन् त्यांच्या त्या लहानग्या झोपड्यांतून केवढी सुबत्ता! दोन-दोन वर्षं सहज पुरेल एवढा दाणा घराच्या माळ्यावर बांधून ठेवलेला! जमिनीशीं जी ते एकनिष्ठता राखतात, ती त्यांना फळाला येते. आम्ही मात्र तिच्याशीं प्रतारणा करतों, अन् ती आम्हांला उपाशी मारते..."

भटजी पुढें बोलणार होता, पण स्वतःसंबंधीं त्यानें अजून कांहींहि सांगितलें नव्हतें, म्हणून मी म्हटलें,

" तुम्ही स्वतःसंबंधीं कांहीं सांगणार होता ना ? "

" हो, माझं हें असंच होतं. या वयांत आठवणच राहत नाहीं. आतां तुम्हांला माझी हकीकत सांगतोंच."

तो थोडा वेळ थांबला, अप्रिय गोष्टी उघड करतांना मनाची जी विचित्र धडपड होते तशीच त्याच्या मनाची झाली असावी; कारण हकीकत सांगण्यास सुरुवात करण्यापूर्वी त्याचा मूळचा अंतर्मुख चेहरा अधिकच अंतर्मुख झाला, आणि त्यावर त्याच्या मानसिक कलहाचें प्रतिबिंब पडले. तो सावकाश म्हणाला,

" जमिनीच्या मायेचं मला बाळकडूच मिळालं होतं. पिढ्यान् पिढ्या आमच्या घराण्यांत जमिनीची सेवा करण्यांत आली होती. मी लहान, चार वर्षांचा होतों तेव्हांपासून कुळागरांत काम करीत असे. त्या वयांत देखील वडील काम करीत असतांना मी त्यांच्या शेजारीं उभा राहून मोठ्या उत्सुकतेनं सगळं पाहत असे. तुम्हांला खोटं वाटेल, पण गोष्ट खरी आहे. त्या मोठ्या कुळागरांत लावलेल्या केळी, पोफळी मीं अगदीं मोजून ठेवल्या होत्या. आणि कोणकोणत्या केळी व्याल्या आहेत, त्यांच्या घडांना किती केळी आहेत, हें सगळं मला ठाऊक होतं. मला शिक्षण नको होतं. मला भिक्षुकीची आवड नव्हती. आईची फार इच्छा, कीं मीं चांगलं संस्कृत शिकून शास्त्री-पंडित व्हावं, अन् लोकांत नांव काढावं. पण असल्या वृत्तीचा मला तिटकारा होता. समोर आपलं कुळागर पसरलेलं असतांना पोटासाठीं भिक्षुकी पत्करून मी शास्त्री-पंडित होऊं ? ज्याला कीर्तीची आवड असेल, त्यानं पंडित व्हावं. मला ती नको होती. जमिनीच्या वेडांत मला धन, कीर्ति, मोठेपणा, कांहीं कांही नको होतं. दिवसरात्र एक माझं कुळागर ! माझं कुळागर पण किती सुंदर होतं ? तिथं कुणीहि शिरलं, की तिथून

हलूं नये असं त्याला वाटावं! जिथं तिथं चिमुकलीं तळीं होती. डोंगरा-वरून येणाऱ्या स्वच्छ पाण्याचे पाट कुळागराच्या वेगवेगळ्या थरांतून खेळवले होते. पोफळी, केळी, फणस वगैरे झाडं अशीं कांहीं समांतर व व्यवस्थित लावलीं होतीं, की दर हाताला एक मूळ लावूनहि झाडांची गर्दी दिसत नव्हती. एका टोंकाला राहून नजर फेकली, म्हणजे कुळागरांतील लहानमोठीं सगळीं झाडं मोजून घ्यावी! मी वाढत होतों; पण माझी वाढ माझ्या लक्षांत कुठं होती? कुठलं झाड किती वाढलं आहे, कुठं नवीन झाड लावलं पाहिजे, या विचारांत आपल्या आयुष्याचे दिवस मोजायला कुणाला फावत होतं!

"मी वयांत आलों, नि घरांत माझ्या लग्नाचं घाटूं लागलं. आई-बाबांनीं लग्न होण्यासाठी आग्रह चालविला; पण माझं सगळं मन कुळागराच्या संसारांत रमून गेलं होतं. त्या मायेंत स्वार्थाचा, फायद्याचा अंशहि नव्हता. निरपेक्ष रीतीनं केलेल्या प्रीतींत केवढी जादू भरलेली असते, नाहीं? फायद्यातोट्याचे हिशेब मांडून माया करणारा इसम करंटाच नाहीं का? कुळागर मला पोशीत होतं, म्हणून त्याच्यासाठीं मी कष्टत नव्हतों. कुळागरानं मला पोसावं म्हणून मी माझ्या घामाच्या पाण्यानं तीं मुळं शिंपीत होतों. तसं केल्याशिवाय मला जगतांच येत नव्हतं म्हणून मला कुळागर हवं होतं! कुळागर काय उत्पन्न देतं, हा विचार माझ्या मनांत मीं केव्हांहि येऊं दिला नाहीं; आणि कुळागराच्या कामाची वाण मला केव्हांच भासली नाहीं. पोफळीला नेमानं पाणी देणं, पोफळी पाडणं, पोफळं पाडून सुपारी तयार करणं, केळी लावणं, जून झालेले घड कापून आणून ते पिकत घालणं, अशीं एक ना दोन, किती तरी कामं मला नित्य करावीं लागत! आणि हीं कामं करतांना आयुष्याचे

दिवस झराझर कसे निघून जात हें मला कळत नव्हतं! बाहेरचं जग कसं आहे, अन् तें कसं बदलत आहे, याची मला जाणीव नव्हती. माझं कुळागर प्रत्यहीं वाढत आहे, समृद्ध होत आहे, अन् त्याबरोबर माझ्या घरांत समृद्धि नांदत आहे, एवढंच मला दिसत होतं.

"तुम्हांला वाटेल, काय वेडा माणूस हा! जमिनीवर, झाडांवर का कुणी असं प्रेम केलं आहे? हो; प्रेम दिल्याशिवाय मिळत नसतं! माझी जमीन, माझीं झाडं माझ्याकडे बोलत होतीं. त्यांचीं सुखदुःखं मला कळत होतीं. पाळलेलीं जनावरं आपल्याकडे बोलत नाहींत, असं का तुम्हांला वाटतं? ज्यांना आपलीं सुखदुःखं बोलून दाखवतां येत नाहींत अशीं अर्भकं कांहींच का आपल्याला सांगत नाहींत? तीं सगळीं बोलतात पण त्यांचं बोलणं कळण्याइतकं आपलं मन हळुवार बनलं पाहिजे. कोणत्या झाडाला काय इजा झालेली आहे, तें मला अंतःस्फूर्तीनंच कळत असे. झाडावर नजर पडतांच त्याची सगळी स्थिति जणूं काय माझ्या नजरेपुढं उभी राही. काय सांगूं तुम्हांला महाराजा! तुम्हांला निर्जीव वाटणारीं हीं झाडं मुक्या भाषेंत माझ्याकडे बोलत होतीं. त्यांचे दुःख निःश्वास मला कळत होते; त्यांचे समाधानाचे उद्रेक मला प्रतीत होत होते. तुम्हांला मुलंबाळं आहेत ना? त्यांच्या आईला जाऊन विचारा, तुझीं मुलं कोणत्या आधारावर जगतात, वाढतात? त्यांना काय मिळतं म्हणून तीं हसतात, प्रसंगीं रडतात, पुन्हा हसतात? त्यांच्या मनाला कोणत्या गोष्टीमुळं चेतना मिळते? अन्नपाण्यानं का? नाहीं. पोशाकानं? छेः! ती तुम्हांला असं सांगेल, कीं आपल्या मायेनं, आपल्या प्रेमानं आपलीं बाळं जगतात आणि वाढतात! आपल्या सहवासांत तीं हसतात व टवटवीत होतात. आपली माया हेंच त्यांचं जीवनकेंद्र; तेंच त्यांच्या

स्फूर्तीचं निधान. मग त्या मुलांच्याभोंवतीं गरीबीनं आपलं जाळं पसरलेलं का असेना! एका प्रेमामुळं जीवन फोफावून जातं! तें नसलं, तर ते शोषलं जाऊन नष्ट होतं!

"तसंच जमिनीचं असतं महाराजा! चांगल्या खताच्या राशीत जी शक्ति नसते, ती आपल्या दृष्टींत असते, आपल्या प्रेमळ स्पर्शांत असते. रोज तुम्ही झाडाच्या एका रोपाला हातानं स्पर्श करा, नेत्रानं त्याला कुरवाळूं लागा, तुमच्या सदिच्छेचं रोज त्याला स्नान घाला, म्हणजे तुम्हांला असं दिसून येईल, कीं कोणत्या तरी अदृश्य शक्तीनं तें झाड प्रफुल्ल होत आहे; तें विलक्षण गतीनं वाढत आहे; आणि तुम्हांला असा मजेदार अनुभव येईल, कीं त्याच्या विकासाबरोबर तुमच्या अंतर्गत शक्तीचा विकास होत आहे, तुमच्या आनंदाचं क्षेत्र वाढत आहे..."

भटजी एवढ्यावर थांबला. जें जें रुचेल, जें जें स्फुरेल तें तें बोलून टाकावं हीच त्याच्या स्वभावांतील प्रमुख सवय होती, त्यामुळे आपण काय बोलत आहों, अन् कुठें वाहवत आहो याचें त्याला भान नव्हतें.

"आई वारली, वडील वारले—त्यांची फार इच्छा माझं लग्न व्हावं! पण बायकोची तळमळ अशी मला वीसबावीस वर्षांच्या वयापर्यंत लागलीच नाहीं. मग लग्न कां करायचं? जमिनीची सेवा चालूच होती. एक मी दिवस आजारी पडलो. माझी सेवा करायला माझ्याशिवाय कुणीहि नव्हतं, हाच विचार मला अधिक जाचक झाला. एखाद्या आजारांत मी वारलों तर, माझ्या कुळागराचं काय होईल, तें कुणाच्या हातांत पडेल, आणि न वारलों तरी आपल्या पश्चात् कांहीं वर्षांनंतर तें कुणाच्या हातांत जाईल, ह्याचीच मला काळजी लागून राहिली होती.

"नाहीं. माझ्या कुळागरासाठींच मला लग्न केलं पाहिजे. कुळागरावर माझं जें प्रेम आहे, जी भक्ति आहे, त्या भक्तीच्या साम्राज्यांतच

माझी बायको वाढली पाहिजे व मला मुलं झालीं पाहिजेत अन् त्यांना मला दुसरं कांहींहि देतां न आलं, तरी हा माझा ध्यास, हें माझें प्रेम त्यांना मिरास म्हणून ठेवतां आली पाहिजेत. माझ्या पूर्वजांनी हेंच नाहीं का केलं? किती शतकं त्यांनी याच भूमींत काढलीं असतील कुणास ठाऊक! ते मरून गेले, पण त्यांनीं ठेवलेली भूमि अमर राहिली; अन् त्यांनी ठेवलेला हा भक्तीचा वारसाहि अमर राहिला. भूमीच्या प्रेमाची ही ज्योत आपण मुलांबाळांच्या हृदयांत अखंड तेवत ठेवायला नको का?

"हे विचार मनांत आणूनच मीं लग्न केलं. मुलंबाळं होऊन माझं घर समृद्ध झालं; पण माझं कुळागर त्यापेक्षांहि समृद्ध झालं. अन् सगळ्या गोमंतकांत माझ्या कुळागरासारखं कुळागर सापडायचं नाहीं, असें जो तो म्हणे. मातृभूमीच्या मोठेपणाचं, औदार्याचं, प्रेमळपणाचं माझं कुळागर हें दृश्य स्वरूपच होतं. जमीन म्हणजे काय चीज आहे, हें तुम्हांला माझं कुळागर पाहिल्याशिवाय कळणं शक्य नव्हतं.

"अशा या निरपेक्ष, एकनिष्ठ सेवेंत माझ्या आयुष्याचीं साठ वर्षे निघून गेलीं. जणूं काय साठ दिवसच! जीवितांतील सगळ्या आशा-आकांक्षा बुडवून टाकणारा कोणता तरी उच्च ध्यास हृदयानं घेतला म्हणजे कालाच्या गतीची जाणीव माणसाला कुठं राहते! पण आयुष्याच्या उत्तरार्धांत एक दिव्य माझी वाट पाहत बसलं होतं.

"एक दिवस मला सरकारतर्फे कळवण्यांत आलं, कीं माझ्या जमिनीवर दुसऱ्याचा हक्क आहे. जमिनीला एक नवीनच धनी उपस्थित झाला. घरच्या मंडळीचा आग्रह म्हणून मी न्यायदरबारांत भांडलों देखील; परंतु कांहींहि साध्य झालं नाहीं. मला वाटलं, माझा प्राणच गेला. ज्या जमिनीवर जन्म पावलों, खेळलों, वाढलों, जिच्यासाठीं सगळं

विसरून जाऊन आयुष्यभर कष्टलों, ती माझी जमीन दुसऱ्याची होणार होती! माझ्या सान्निध्याच्या उबेनं आणि श्वासोच्छ्वासाच्या स्पर्शानं जी झाडं वाढलीं तीं मला कायमचीं अंतरणार होतीं. पण काय करणार! दुर्दैवापुढं इलाज नव्हता. पण आतां जगायचं कसं हा मला प्रश्न पडला. जमिनीशिवाय जगणं मला शक्यच नव्हतं. बायको व मुलं दुसरीकडे निघून गेलीं; पण मी तीन दिवसपर्यंत त्या कुळागरांत वेड्याप्रमाणं उपाशीच भटकत राहिलों. चौथ्या दिवशी दर झाडापाशीं रडून, त्या झाडांना आलिंगन देऊन मी तिथून निघालों. तेव्हांपासून गेला महिनाभर मी गोमंतकभर जमिनीच्या शोधार्थ फिरत आहे.

"तुमची 'कुळया'ची जमीन माझ्या नजरेला पडली, आणि माझं हृदय उचंबळून आलं. काळ्या भुसभुशीत मातीची ती जमीन माझ्या दयेची याचना करीत पडलेली आहे, असा मला भास झाला. आपल्या उदरांत रसरूपानं साठवून ठेवलेलं वैभव फलसमृद्धीच्या रूपानं जीवनाला देणं हाच तिचा धर्म. या धर्माप्रमाणं वागतां न आल्यामुळं ती जणू काय पीडित झाली होती! तिच्या कणाकणांतून आर्तस्वर निघत होते! आपल्या परिपक्व कौमार्याचं रूपांतर मातृत्वांत करण्यासाठीं अधीर झालेल्या तरुणीला आपली ती इच्छा वर्षानुवर्षं पुरी करतां येऊं नये, म्हणजे तिच्यावर जी भेदक अवकळा पसरते, तशी अवकळा त्या दीन भूमीला आली आहे असं मला दिसून आलं.

"त्या जमिनीच्या स्पर्शासाठीं माझे हात स्फुरूं लागले. मी तिथं जाऊन आनंदानं फिरलों; त्या जमिनीची माती हातांत धरून ती हुंगली; तिथं कांहीं तास बसलों; निरनिराळीं सुखस्वप्नं योजलीं! तिच्या सान्निध्यांत माझं वार्धक्य, माझीं दुःखं, माझे भग्न मनोरथ, सगळं कांहीं विरून गेलं अन् माझं हृदय नवचैतन्यानं उडूं लागलं. वाटलं, मी

तरुण आहे; ही जमीन, कित्येक वर्षे माणसाच्या स्पर्शासाठीं हपापलेली ही जमीन, मला हाका मारीत आहे, माझ्यासाठीं तळमळत पडली आहे! माझं कुळागर गेलं, पण दुसरी जमीन परमेश्वरानं मला दिली. एकच भूमाता वेगळ्या स्वरूपांत तिथं मला दिसली. चांगली वसलेली, भरपूर पीक देणारी जमीन मला नको होती. मला माझ्या कष्टांनीं नवीन राज्य वसवलं पाहिजे होतं. उष्णतेनं करपलेल्या, दुक्खनिःश्वास टाकणाऱ्या त्या भूमींतून मला फळांफुलांचं हास्य जागोजाग फुलवलं पाहिजे होतं जिथं पावसाशिवाय पाण्याचा थेंब नव्हता, तिथं मला पाण्याचे प्रवाह खेळवले पाहिजे होते. जिथं एखादा पक्षीहि चुकून फिरकत नसे, तिथं पक्ष्यांची भिरी, वृक्षराजीच्या दाटींत बसून आनंदानं घरटीं करीत आहेत, गात आहेत, नवी सृष्टि वसवीत आहेत, असं मला केलं पाहिजे होतं.

" मी सध्यां एकटा आहे. लोकांना संसारासाठीं, बायकोपोरांसाठीं भूमि पाहिजे असते; मला भूमीच्या संसारासाठीं बायकोपोरं पाहिजे होतीं. ती जमीन गेली; मग मला बायकोपोरांची काय गरज होती? या नवीन जमिनींत मी नवीन संसार उभारणार होतों...."

भटजी बोलतच होता. गाडी 'कुळया'च्या स्टेशनांत थांबली व आम्ही खालीं उतरलों.

थोड्याच वेळांत आम्हीं त्या जमिनींत पोंहोचलों. तिच्यावर नजर पडतांच भटजीच्या नेत्रांत विलक्षण तेज चमकूं लागलें. आनंदभरानें त्याचा चेहरा खुलला. त्याच्या अवयवांत चैतन्य शिरल्यासारखें झालें.

त्या जमिनीचें स्वरूप पाहून मी हताश झालों. पण भटजी लहान मुलाप्रमाणें आनंदानें बागडूं लागला. मला वाटलें हा माणूस खरोखरच वेडा तर नसेल ना?

जमिनीवर दाट झाडझुडपें वाढलीं होतीं. एका बाजूला डोंगर उभा होता; दुसऱ्या बाजूला मोठमोठ्या वृक्षांचें रान माजलें होतें. कुणालाहि हें दृश्य पाहून असें वाटलें नसतें, कीं या रूक्ष जमिनींत सुपीकता दडून बसली आहे. तथील भयाणता तेवढी मला प्रतीत होत होती. परंतु भटजीला भविष्यकालांतील दृश्य दिसत होतें. तो खणून पाही, माती हातांत घेऊन तिची चिमूट तोंडांत टाको आणि म्हणे,

" सुपीक जमिनीचे सगळे गुण या मातींत आहेत. थोड्याच वर्षांत तुम्ही ही जमीन ओळखायला विसराल."

त्याच्या त्या उच्च वेडाला मी मनांत हसतच होतों. त्या रखरखीत जमिनींतून तो नवीन बाग कशी उत्पन्न करणार, याचें मला राहून राहून आश्चर्य वाटत होतें.

नंतर आम्ही पाणी पाहण्यासाठीं गेलों. मैल दीड मैलाच्या अंतरावर नदीचा फाटा वाहत होता. तेथून पाट फोडून आपण पाणी कसें आणणार, तें त्याने मला समजावून सांगितलें.

दुसऱ्या दिवशी आम्ही तेथून परतलों.

* * *

एका वर्षानंतर भटजी माझ्या घराकडे आला. तो आतां सर्वस्वीं बदलून गेला होता. विजयी वीराचें तेज त्याच्या मुद्रेवर खेळत होतें. त्याच्या नेत्रांत पूर्वीची विकलता नव्हती. तो पंचवीस वर्षांनी तरुण दिसत होता.

तो माझ्या टेबलाशेजारी येऊन उभा राहिला व आपल्या उपरण्याची पुरचुंडी सोडून रुपयांची रास त्यानें टेबलावर सोडली.

मी आश्चर्यचकित झालों. त्यानें कबूल केलेली खंडाची रक्कम मिळल,

ही आशाच मला नव्हती; इतकेंच नव्हे, तर माझी जमीन त्याच्या हातून लागवडीला येईल याचीच मला शंका होती.

माझ्याकडे पाहत तो म्हणाला,

" ही तुमच्या खंडाची रक्कम मोजून घ्या."

" एवढी रक्कम तुम्ही मला एका वर्षांत देऊं इच्छितां !"

" यांत काय संशय? आपली सोन्याची खाण तुम्हीं माझ्या स्वाधीन केली; मग सोनं नसलं, तरी ही रुप्याचीं नाणीं मीं तुम्हांला देऊं नयेत वाटतं ?"

" तुमच्या अपेक्षेप्रमाणं जमीन उतरली ना ?"

"माझ्या अपेक्षेपलीकडे उतरली. तुमची जमीन अतिशय सुपीक आहे हें तेव्हांच कळलं होतं. एवढंच की अजून तिनं आपलं खरं रूप दाखवलेलं नाहीं."

" म्हणजे ?"

" मीं केलेले संस्कार तिच्यावर नवीनच होते त्यामुळं कल्पनेबाहेर तिथं खपूनहि माझ्या मनाप्रमाणं एका वर्षांत जमीन उत्पन्न देऊं शकली नाही."

तो थोडा वेळ थांबला. मी त्याला बसावयाला सांगितले. इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्यावर तो म्हणाला,

" आतां तुम्ही जमीन पाहायला केव्हां येतां? तुम्ही तिथं जाऊन नजर टाकल्याशिवाय मला समाधान लाभणार नाही."

" मी तिथं लौकरच येईन. पण तुमची बायकामुलं सध्यां कुठं आहेत तें मला आधी सांगा पाहूं ?"

" माझ्या प्रयत्नांनी वसवलेली जमीन माझ्यापाशी असतांना मी त्यांना बाहेर कसा ठेवीन? सुरुवातीचे चार महिने झाडंझुडपं मारून

मी जमीन साफसूफ करण्यांत घालविले. नदीला पाट फोडून जमिनी-च्या सगळ्या भागांतून पाणी खेळवलं; मशागत झाल्यावर लागवड केली व मग मुलांबाळांना आणलं. सध्यां माझी बायको, आमचे चौघे मुलगे अन् पांचसहा नातवंडं बागेंत किती आनंदानं काम करतात!"

मीं आग्रह करून भटजीला राहवून घेतलें. जमिनीसंबंधीं पुष्कळ बोललों. जमीन पाहायचें माझ्याकडून वचन घेऊन भटजींनीं निरोप घेतला.

* * *

तीन वर्षे केव्हांच निघून गेलीं. या अवधींत मी एकदांहि 'कुळया' ला पोंहोचलों नाहीं. जमीन पाहण्याची इच्छा होती; परंतु इतर व्यापा-मुळें एक दिवस मोडून कुळयाला जायला मला फावत नव्हतें. भटजी दरवर्षी नेमानें खंडाचे रुपये आणून देई; व आपण तयार केलेली बाग पाहून जाण्याबद्दल विनंति करी.

हा प्रकार तीन वर्षे चालू राहिला. चौथ्या वर्षी भटजी रक्कम घेऊन आला, त्या वेळी त्याच्या देहांत व वृत्तींत किती तरी बद्दल झालेला मला दिसून आला. पैसे माझ्या स्वाधीन करून श्रांत नजरेनें माझ्याकडे पाहत तो म्हणाला,

" महाराज, यंदा आपण जमीन पाहिल्याशिवाय राहूं नये. आपण तिचं आजचं स्वरूप पाहून तिचं कोडकौतुक केलं नाहीं. तर कोण करणार? आतां मी पूर्वीचा राहिलों नाहीं. 'कुळया'ला मीं जें कांहीं केलं आहे, त्यामुळं माझ्या शारीरिक शक्ति संपुष्टांत आलेल्या आहेत. एका विशिष्ट वयापर्यंतच मनाचं सामर्थ्य देहावर विजय मिळवूं शकतं, वार्धक्यानं आपली सीमा गाठली म्हणजे मग शरीराबरोबरच मनदेखील विकल होतं; अन् माझ्यासारखा साध्या माणसालादेखील पलीकडची हुरहुर

लागते. माझं नवं जग पाहून मी जगत आहे खरा; परंतु तें जगणं म्हणजे खरं जगणं नव्हे! माझ्यानं आतां बागेंत काम करवत नाहीं, मग जगण्यांत मला मौज कशी वाटेल? ज्यानं आपला सगळा जन्म काम करण्यांत घालवला त्याच्यावर निष्क्रियतेंत दिवस काढण्याचा प्रसंग आला, म्हणजे त्याला केवढ्या यातना होतील याची कल्पना करा. सध्यां माझीं पावलं मरणाच्या दिशेनं वेगानं पडत आहेत. अशा वेळीं आपण माझी बाग पाहावी व नंतर त्या बागेंतच मीं चिरकाल विश्रांति घ्यावी, एवढीच माझी इच्छा आहे."

भटजीचा कातर स्वर मला असह्य झाला. हातांतील काम अर्धवट सोडून पोषाक करीत मीं भटजीला म्हटलें,

" भटजी, मला क्षमा करा. गेलीं तीन वर्षे मीं तुमच्या उद्योगाकडे कठोरपणानं दुर्लक्ष केलं. आज मात्र मीं तुमच्याबरोबर येत आहे."

—आणि योग्य वेळीं आम्हीं 'कुळया'ला पोंचलें.

आम्ही एका टेकडीच्या माथ्यावर आलों, तेव्हां भटजीच्या नव्या जगाची इशारत देत तेथें पांच-पन्नास गुरें स्वैरपणें चरत असलेलीं दिसलीं.

मीं खालीं नजर फेकली आणि तेथून दिसणारा अवर्णनीय देखावा पाहून माझें हृदय अपूर्व आनंदानें नाचूं लागलें. पूर्वींच्या रुक्षतेची-भयाणतेची तेथें कोणतीच खूण राहिली नव्हती. भूमीच्या उदार उदरांतून निघालेलें व फोफावलेलें कोंवळें लुसलुशीत जीवन तेथें खेळत, बागडत होतें. निसर्गाचें बाल्य आपल्या सगळ्या वैभवानिशीं तेथें चमकत असून त्या विस्तीर्ण जमिनीचें भटजीनें नंदनवन बनविलें होतें. पक्ष्यांची किलबिल व पाण्याची खळखळ यामुळें त्या प्रदेशाला जिवंतपणा आला होता अन् वनस्पतीचे विविध, सजीव रंग व आकार यामुळें त्याला विलक्षण सौंदर्य आलें होतें.

टेकडी उतरून आम्ही खाली आलों. आपली बाग दाखवायला भटजी अधीर झाला होता. नवसासायासांनीं झालेलें मूल सुंदर, गोजिरवाणें निघावें म्हणजे त्याच्या वत्सल मातेला तें प्रहिल्यांदाच आपल्या प्रिय पतीला दाखवितांना काय होत असेल याची कल्पना केली म्हणजे तुम्हांला भटजीची मनःस्थिति समजेल.

आम्ही दृष्टीस पडतांच मळ्यांत काम करीत असलेली भटजीची बायको व इतर मंडळी आमच्याभोंवती गोळा झाली. सगळ्यांच्या चेहऱ्यांवर एकच पवित्र आनंद चमकत होता. निसर्गाच्या आत्म्याचा मोठेपणा सगळ्यांच्या नेत्रांत जणूं काय नाचत होता.

भटजी म्हणाला,

"चला आपण थोडे फिरून येऊं."

भटजी पुढें झाला. मी त्याच्या मागोमाग मंत्रमुग्धाप्रमाणें चालूं लागलों.

"हें नाचणारं पाणी इथं आणायला किती कष्ट पडले असतील? तुम्हांला इथं दिसत असलेलीं कुळवाडी लोकांचीं हीं तीस-चाळीस झोपडीं त्या वेळीं इथं कुठं होतीं? तेव्हां मी अगदीं एकटा होतों. पाण्याशिवाय हा सगळा पसारा मांडतां येणार नाहीं, हें मला माहीत होतं म्हणून पहिले कांहीं महिने खपून दगडा-धोंड्यांतून पाट फोडीत मीं इथपर्यंत पाणी आणलं. पाण्याची पहिली धार या तृषार्त भूमींत पडली त्या वेळीं, मला किती आनंद झाला असेल तें गंगेला खालीं उतरविणाऱ्या भगीरथालाच माहीत! पाण्याचं अमृत इथं उतरलेलं लोकांनीं पाहिलं, अन् नंतर हे कुळवाडी लोक या जमिनीची सेवा करायला माझ्याकडे आले.

"मी आधीं हें कुळागर लावलं. तीन वर्षांनीं पोफळीचीं कोंवळीं पोरं

किती वर्षांनीं पीक देऊं लागतील असं तुम्हांला वाटतं ? पण त्यांचीं फळं लवकर मिळण्याची आशा नसली, तरी ती उत्पन्न केल्याचं समाधान कांहीं लहानसहान नाहीं ! अन् नाहीं तरी, आमचीं मुलंबाळं आहेतच ना ? आपण पेरावं अन् आपणच खावं, अशा आकुंचित वृत्तीनं माणूस कार्यप्रवृत्त झालं असतं, तर जग इतकं सुंदर दिसलं असतं का ? शेंकडों वर्षांपूर्वी लावलेल्या आंब्याफणसांची गोड फळं वर्षानुवर्ष आपण खात नाहीं का ?"

एकमेकांबद्दल दाट स्नेहभाव बाळगून स्तब्ध उभ्या असलेल्या चिमुकल्या पोफळी पाहून झाल्यानंतर आम्ही बागेच्या दुसऱ्या विभागाकडे वळलों. तेथें केळी लावल्या होत्या. शेंकडों झाडें दाटीनें लावल्यामुळें त्यांचीं लांबरुंद पानें एकमेकांत मिसळून एक प्रचंड हिरवेंगार छप्परच जणूं काय बनलें होतें.

आम्ही केळीच्या वनांत शिरलों. भटजी म्हणाला,

"कांहीं झाडांशीं आम्हां हिंदूंच्या धार्मिक भावना निगडित झाल्या आहेत, असं नाहीं का तुम्हांला वाटत ? आमच्या भावनेवर परंपरागत रीतीनं आमच्या धर्मांचे व संस्कृतीचे जे निरनिराळे संस्कार झाले आहेत, त्यामुळं कांहीं झाडं आम्हांला सुंदर वाटतात. हीं सरळ, गोल व शुभ्र खोडं व वरती हिरव्यागार पानांचा डौलदार झुबका यामुळं आकर्षक वाटणाऱ्या या केळी, म्हणजे हिंदु संस्कृतीच्या पावित्र्याचं अन् औदार्याचं प्रतीकच आहेत, असं नाहीं का तुम्हांला वाटत ? या केळीचे हे तीन हात लांबीचे हे भरभक्कम घड पहा ? याचं एकेक केळ हातभर वाढतं बघा ! यांना आपण 'भैंडोळी' केळीं म्हणतों."

—आणि आपल्या एका नातवाला जवळ बोलावून भटजीनें म्हटलें,

" धन्यासाठीं दोन मैंडोळी केळीं घरांतून घेऊन ये पाहूं ! "

मुलगा धावतच घरांत गेला व लवकरच दोन मोठीं पिकीं केळीं आणून त्यानें माझ्याकडे दिलीं.

भटजी म्हणाला,

" हीं केळीं खाऊन बघा. म्हणजे तुमची जमीन किती गोड आहे, तें तुम्हांला कळून येईल."

हे शब्द ऐकून मला हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं.

आम्ही बराच वेळपर्यंत बागेंत हिंडलों. भटजीनें प्रत्येक लागवडी-कडे मला नेऊन त्यासंबंधींची शास्त्रोक्त व व्यावहारिक माहिती मला विस्तारानें पुरविली. एरवीं मला ती कंटाळवाणी वाटली असती; परंतु भटजीच्या रसरशीत वाणींतून अनुरूप हावभावांनिशीं निघतांना ती मला कंटाळवाणी वाटली नाहीं. माझे दोन तास केव्हांच निघून गेले.

बागेंतील फळें पोटभर खाल्ल्यानंतर मी जावयाला निघालों. भटजी मला बागेच्या कुंपणापर्यंत पोंचवायला आला. आदर व कृतज्ञता यांनीं भरलेल्या नजरेनें मीं भटजीकडे पाहिलें. जगाला अज्ञात राहिलेला, लौकिक मोठेपणाची हाव न बाळगलेला, समाजाच्या दृष्टीनें अडाणी व क्षुल्लक, असा तो साधा, सरळ माणूस त्या सृष्टीचा निर्माता होता. त्यानें भूमातेचे पांग फेडले होते. मीं त्याच्याकडे आदरानें वळून पाहिलें व त्याचा निरोप घेतला.

* * *

कांहीं दिवसांनंतर तार करून मला अकस्मात् 'कुळ्या'ला बोला-वण्यांत आलें. मी अधीर मनानें तेथें गेलों. बागेपासून हाकेच्या अंतरा-वर येतों, तों आकाशांत धुराचे लोट चढत असलेले दिसले. बागेपर्यंत मी धावतच गेलों. तेथें भटजीच्या निधनाची हकीकत मला कळली.

बागेच्या एका कोपऱ्यांत भटजीचा देह दहन करण्यांत आला होता. मीं चितेच्या शेजारीं साष्टांग नमस्कार केला. भूमातेचे लाड पुरवितांना हा अज्ञात वीर अनंतांत विलीन होत होता.

थोडया वेळानंतर मी भटजीच्या घरीं गेलों. सगळी मंडळी रडूं लागली. भटजीला आकस्मिक मरण आलें होतें. तो प्रसंग जितका करुण तितकाच उदात्त होता. आयुष्यांत पहिल्यांदाच मला एका दैवी भावनेचा साक्षात्कार होत होता. मीं सगळ्यांनां जवळ बोलावून सद्गदित स्वरांत म्हटलें,

"या जमिनीवर आजपासून माझा अधिकार नाहीं. ज्यांनीं ती वसवली, आणि तिला खरीखुरी जमीन करून तिच्यासाठीं देह ठेवला त्या महात्म्याची ही जमीन आहे. त्यानं ठेवलेला जमिनीच्या मायेचा हा वारसा तुम्ही पुढं चालवा." इतकें सांगून मी शून्य मनानें तेथून परतलों.

आकाशांत अजून धूर चढतच होता. त्या धुराच्या विरल वलयांत भटजीचा दिव्य संदेश सारें वातावरण व्यापून टाकीत आहे असा मला भास झाला.*

---

[ * या गोष्टींतील कांहीं भाग ऑल इंडिया रेडिओ, मुंबई, येथें सांगण्यांत आला होता.

# मोडलेला माड

पावसाची सर नुकतीच येऊन गेली होती; त्यामुळें आकाश धुऊन गेलें होतें. सगळी सृष्टि न्हाऊन निघाली होती, आणि उघडल्या आभाळांतून सूर्याची पिवळसर उन्हें उंच माडांच्या कवाळ्यवर खेळत होतीं, त्यामुळें सुवर्णजलाचा शिडकावा वृक्षराजीवर होत असून ती नाजूक रीतीनें हसत आहे असा भास होत होता.

एका लहानशा उंचवट्यावर शांतादुर्गेचें देवालय आपल्या राजशाही थाटांत उभें होतें. जणूं काय, एखादी राजनगरीच आपल्या वैभवाचा दिमाख मिरवीत वृक्षराजींतून डोकावून पाहत आहे !

चौघडा झडूं लागला व त्याच्या निनादलहरींनीं, छायाप्रकाशाच्या अपूर्व मिलाफामुळें माझ्या मनांत उत्पन्न झालेली हुरहूर शांत होऊं लागली. देवाची भेट होत आहे म्हणून उत्पन्न होणारी ती भक्ति नव्हती. पण, भक्तीपेक्षांहि व्यापक, पवित्र अशी भावना, त्या प्रदोष-

काळीं, माझ्या हृदयांत स्फुरूं लागली. आत्मविस्मृति पाडण्याइतकें चैतन्य व पावित्र्य जें दृश्य प्रेक्षकाच्या मनांत उत्पन्न करूं शकतें, त्याचें वर्णन कल्पनेनेंच केलेलें बरें !

डाव्या हाताला बऱ्याच खोलांत बांधून काढलेला तलाव पाहिला, देवळासमोरचा स्तंभ व मागचा घुमट यांवर नजर टाकली आणि मी देवळांत शिरलों.

उत्कट पावित्र्य, शांति आणि गारवा यांच्या प्रतीतीनें माझ्या वृत्ति उत्तेजित झाल्या. छताला टांगलेल्या हंड्याझुंबरांतून तेवणारे पिवळसर दिवे, गर्भकुडींतील असंख्य नंदादीप, जमिनीवरचें शुभ्र काश्मिरी काम आणि भिंतीचा पिवळसर रंग, हें दृश्य प्रेक्षकांच्या मनोवृत्तींशीं सुसंवाद राखणारें असेंच होतें.

मी देवतेला नमस्कार केला, तीर्थप्रसाद घेतला व देवतेची मूर्ति मी न्याहळून पाहूं लागलों. इतक्यांत, माझ्या पाठीवर मागून कुणी तरी हळूच थाप मारली आणि बाबासाहेब दणाइतांची मूर्ति नजरेला पडतांच मी आश्चर्य व आदर या भावनांनीं त्यांना विचारलें, “ काय बाबासाहेब, आपण इकडे केव्हां आलांत ! वहिनी ठीक आहेत ना ?–”

बाबासाहेबांची चर्या एकदम पालटली. एरव्हीं प्रशान्त दिसणाऱ्या त्यांच्या मूर्तीवर आंतरिक कलहाची छाया पसरली. त्यांच्या हास्याचा गोडवा मावळला. वात्सल्य व सहानुभूति या भावनांनी नेहमीच भरून असणाऱ्या त्यांच्या नजरेंत कारुण्य तरळूं लागलें. किंचित्काल त्यांनीं आपली नजर अंतराळांत स्थिर केली, आणि थोड्या वेळानें भानावर आल्यासारखें करून मला म्हटलें, “ बाळू, चल, आधीं आपण घराकडे जाऊं. नंतर सावकाश तुला माझी हकीगत सांगेन.”

मला कळून चुकलें, कीं या थोर माणसाच्या आयुष्यांत कोणती तरी

क्रांति घडलेली आहे. संसाराच्या संग्रामांत विजय मिळविलेला हा पुरुष कोणत्या तरी लौकिक वेदनांनी तळमळत आहे. मी तेथें अधिक बोललों नाहीं.

ते पुढें झाले. मी त्यांच्या मागोमाग जड पावलांनीं चालूं लागलों.

वाटेंत माझें विचारचक्र सुरू झालें.

" बाळू," मध्येंच त्यांनीं म्हटलें, " संसारांत आपण कांहींच नाहीं करीत; माणसानं उगीच घमेंड मारावी. आयुष्यांत कांहीं प्रसंग, कांहीं क्षण इतके प्रबल असतात, कीं त्यांच्या कक्षेंत आपण आलों, म्हणजे काय करावं हें आपल्या हातीं राहतच नाहीं मुळीं ! हा पाहिलास मोडून पडलेला माड ? काल मी देवळांतून येतांना हा माड असा मधोमध मोडून पडला. वादळ नाहीं, वारा नाहीं. एखादी काठी आपण बोटांत धरून लीलेनं मोडून टाकावी, तशा तऱ्हेनं हा माड मोडून दूर फेकून दिलेला मीं प्रत्यक्ष डोळयांनीं पाहिला. तो माड मोडून पडतांना मला असं वाटलं, कीं माझं आयुष्य..."

ते थांबले. आम्हीं लवकरच त्यांच्या बिऱ्हाडीं पोंचलों.

घर लहान, पण सुंदर होतें. बाहेर बाग होती.

आम्ही एका माडीवर गेलों. जातांना खालच्या एका दालनांत एक बाई दिसली, पण ती कांहीं वहिनी नव्हती.

मी कपडे काढून खुर्चीवर बसलों. बाबासाहेब खालीं गेले. मीं खिडकींतून बाहेर पाहिलें.

आतां आकाशांत नक्षत्रें चमकत होतीं. एका पांढऱ्या ढगाच्या आड चंद्रकोर रेंगाळत होती. कांहीं वृक्षांचे काळेभोर उंच शेंडे आकाशांत हळूहळू हलत होते. वारा सुटला होता.

थोड्या वेळानें बाबासाहेब वर आले, व त्यांच्या मागोमाग ती बाई फराळाचें ताट घेऊन माडीवर आली.

तिला पाहतांच एका विचित्र कल्पनेनें मी दचकलोंच; पण ती कल्पना मनांत आली म्हणून माझी मलाच लाज वाटली. बाबासाहेब म्हणजे सच्छील, धार्मिक वृत्तीचा माणूस! राहणी किती साधी! विचार तसेच उच्च! आणि कृति तर कोणालाहि गहिंवर यावा अशी! बारदेश तालुक्यांत त्यांच्या सौजन्याचे व कनवाळूपणाचे पोवाडे गाणारीं माणसें मीं गांवोगांव पाहिलीं होतीं. घराणें जुनें इनामदाराचें. उत्पन्न थोडें-थोडकें नाहीं! इनामदारीला शोभण्यासारखाच घराच्या आसपासचा परिवार! वीसपंचवीस घरांचा चरितार्थ त्यांच्या औदार्यावर पिढ्यान्-पिढ्या चालत असे! इनामदारांना वाहिलेल्या स्त्रियांकडे, मातृ किंवा भ्रातृत्वाच्या भावनेशिवाय त्यांनीं कधीं पाहिलें नाहीं. शुभ्र साधा पोषाक, गंधाचा टिळा, भरदार मिशा, सतेज गौरवर्ण, चेहऱ्याच्या रेषारेषेंतून व्यक्त होणारें औदार्य व पावित्र्य, डोळ्यांतील प्रेमळपणा व सहानुभूति आणि इतरांच्या मानसिक यातनांना उत्साहाचा, आनंदाचा उजळा देणारें ओठांवरील चिरंतन हास्य, एवढ्या सामुग्रीवर बाबासाहेबांनीं लहान वयांतच हजारों लोकांना अंकित करून ठेवलें होतें.

कुतूहलाच्या दृष्टीनें मीं त्या बाईकडे पाहिलें. वेश्या व विवाहित स्त्री यांच्या गुणावगुणांचें विचित्र पण आकर्षक मिश्रण मला त्या बाईत दिसून आलें. अतिशय चतुराईनें नेसलेलें पिवळसर पातळ व तिची अंगकांति यांमध्यें रंगसंगति होती. तिचा करडा व विपुल केशसंभार तिच्या जीवनांतील गति व जोर जणूं काय दर्शवीत होता! तिच्या डोळ्यांच्या रेषांतून तिच्या वृत्तींतील एक प्रकारचा स्वप्नाळुपणा प्रकट

होत होता. आणि डोळ्यांच्या पाणीदारपणांतून तिच्या मनावर झालेले विविध कलांचे संस्कार व्यक्त होत होते.

* * *

मीं फराळ केला. बाबासाहेब माझ्याजवळ येऊन बसले. कांहीं वेळ सवयीप्रमाणें, बोलण्यापूर्वी, आपली नजर त्यांनीं बाहेर कुठें तरी लावली. नंतर, ती माझ्यावर स्थिर करीत, त्यांनीं शांत पण निश्चयी स्वरांत सुरुवात केली—

' बाळू, माझं दृश्य जीवन तुला माहीत होतं, पण त्याखालच्या जीवनांतील प्रवाहाचं तुला ज्ञान नव्हतं. त्या प्रवाहाचा एका वेळीं जोर झाला, आणि त्यामुळं माझ्या आयुष्याला सर्वस्वीं वेगळी गति मिळाली.

' प्रत्येक माणसांत देव असतो अन् राक्षस असतो. पण देव झोपलेला असतो, अन् राक्षस मात्र सदैव जागृत असतो. देवाला जागृत ठेवण्याचं काम फार कठीण असतं. तें करणारी माणसं विरळा. तसं करण्यासाठीं माणसाला बुद्धिपुरस्सर फार मोठा प्रयत्न करावा लागतो. या प्रयत्नांत शैथिल्य शिरलं म्हणजे राक्षसाचं प्राबल्य सुरू होतं.

' माणसांच्या कांहीं मोठ्या गुणांच्या पोटीं कांहीं दोष जन्म पावतात. गोमंतकांतील कांहीं घराण्यांच्या बाबतीत हीच गोष्ट घडलेली आहे. घराण्यांत वैभव असतं, आणि त्याचा उपयोग समाजाकडे करण्याची वृत्तीहि अंगीं असते. पण या वैभवाच्या संस्कारामुळं वृत्तींत सुखासीनता उत्पन्न होते, आणि परंपरागत रीतीनं ती आपल्या रक्तांत उतरते. ती वृत्ति मारून टाकणं सर्वस्वीं आपल्या हातीं नसतं.

' आमच्या घराण्यानं आज कितीक पिढ्या वैभवांत काढलेल्या आहेत. आमच्या पूर्वजांनीं आपल्या श्रीमंतीचा उपयोग लोकांच्या

उत्कर्षाकडे केला हें खरं असलं, तरी आपल्यांतील राक्षस सतत जागृत ठेवण्यासारखी कृति त्यांच्या हातून नेहमींच घडत आली. त्यांनीं गरीबांना मदत केली, अनाथ मुलींना संसार थाटून दिले, वर्षांतून पुष्कळ वेळां धर्माच्या नांवाखालीं अन्नदान केलं. येथील देवालयांतून मोठमोठे उत्सव व अन्नछत्रं चालू ठेवलीं. हें सगळं त्यांनीं केलं, पण मोहांना दूर सारणं त्यांना शक्य झालं नाही. त्यांनी गरीबीला आश्रय दिला; पण, अधार्मिक तारुण्य अन् सौंदर्य यांना दूर लोटलं नाहीं. यामुळं, येथील श्रीमंतांच्या वाड्यांभोंवती अखंड कुमारिकांचं जाळं पसरलं.

'अशाच एका घराण्यांत माझा जन्म झाला. पण विलासांच्या केंद्रांत राहूनहि मी त्यांपासून अलिप्त राहूं शकलों. अंगीं सुखासीनता होती पण तिला उत्तान स्वरूप मीं केव्हांच येऊं दिलं नाही. माझी विलासप्रियता अनाचाराच्या प्रांताला कधी भिडली नाहीं. माझं वैवाहिक जीवन धार्मिक रीतीनं पाळण्याचा मी प्रयत्न केला, पण इतरांनीं तो टिकूं दिला नाहीं. याला कारण म्हणजे माझ्या पत्नीचा विचित्र स्वभाव, अन् माझा अविचारीपणा!

'व्यसनाधीनता हें माझ्या पूर्वजांचं स्वभाववैशिष्ट्य होतं. आमच्या घराण्यांतील पुरुषांची ही वृत्ति माझ्या पत्नीला माहीत होती. त्यामुळं तिला वाटे, कीं मी केवढाहि सच्छील भासलों, तरी माझ्या रक्तांतील वासनासक्ती केव्हां उसळी मारील याचा नेम नाहीं! तिला असंहि वाटे, की माझ्या वर्तनांतून दिसून येणारा साधेपणा अन् पावित्र्य हें सारं ढोंग तर नाही ना? वारा अन् पुरुष दोघे सारखेच! ते सुटले म्हणजे त्यांना बंधन नाहीं. सच्छील पुरुष देखील प्रसंगी मोहवश होऊन सहज अनीतीचं कृत्य करून जाईल, अन् आपण मोठं पापा-

चरण केलं आहे, हें देखील नंतर त्याला वाटायचं नाहीं, असं
माझ्याकडे म्हणत असे. माझं शुद्ध वर्तन अन् त्याविषयीं तिला केव
केव्हां कळणारं लोकमत या गोष्टींमुळं तिचं समाधान होई. परं
मनाच्या खोल भागांत शंकेचं भूत दडून बसलेलं होतंच.

'मी सहसा रात्रीचा बाहेर राहत नसे. अन् तसा प्रसंग बहु
येतच नसे. वर्षांतून एकदोनदां आलाच तर ती गोष्ट वसुंधरा
फारशी मनाला लावून घेत नसे. एकदां असं झालं, कीं माझा ए
बालमित्र बऱ्याच वर्षांनंतर मुंबईहून इकडे कांहीं दिवस घालवण्यासा
आला. लहानपणीं आमची मैत्री फार जिव्हाळ्याची होती. आयुष्य
च्या दिशा भिन्न झाल्या, तरी लहानपणाचं प्रेम आम्ही विस
शकलों नाहीं. त्या मित्राचं नांव शांताराम करंडे. तो मुंबईस डॉक
झाला, व वैद्यकीच्या धंद्यांत थोड्याच वर्षांत त्यानं नांव व पै
कमावला. हें त्याचं लौकिक जीवन तेवढं मला माहीत होतं. त्याच
खाजगी जीवनासंबंधीं मला अधिक माहिती नव्हती. लवकरच अस
ल्या कवळ्याच्या जत्रेला जाण्याबद्दल त्यानं मला आग्रह केला. एव
माझा जिवलग मित्र! माझ्या कुलदेवतेचा वार्षिक उत्सव! ते
वसुंधरेची परवानगी घेऊन मी त्याच्याबरोबर इथं आलों. थोड
वेळानंतर मला कळून चुकलं, कीं स्वारी कांहींशीं अनिर्बंध आ
आनंदाचा आस्वाद घेतांना धर्माधर्माची त्याला तेवढीशी क्षिती ना
कलांचा आस्वाद चाखतांना आपलं वर्तन स्वैरतेच्या हद्दींत पडलं त
त्याला चालतं. त्याच्या स्वभावांतील हें वैगुण्य मला कळून आलं त
त्याची सोबत टाळणं मला आतां शक्यच नव्हतं. आम्ही दोघे
बरोबरच फिरलों. परंतु कुणाच्या तरी ओळखीनं त्यानं वेगळी
व्यवस्था करून मला या घरांत आणलं, तेव्हां मात्र मी दचकलों

घर वेश्येचं असल्यामुळं मी यायला तयार नव्हतों. पण त्यानं माझी अशी समजूत घातली, कीं कलावंतिणीचं नुसतं गाणं ऐकायला काय हरकत आहे? आपण लग्नप्रसंगांच्या निमित्तानं गाण्याच्या बैठका नाहीं का करीत? गाणं ऐकल्यानं, कलावंतिणींना पाहिल्यानं का कुणाचं शील बिघडतं आहे?

'मीं असा विचार केला, कीं मी पुरुषासारखा पुरुष असून एवढं कशाला भ्यावं? आपलं मन खंबीर आहे ना? परस्त्रीचा विचार आपल्याला कधीं शिवत नाहीं. परस्त्रीचा अभिलाष तर आपण केव्हांच धरला नाहीं. मग साध्यासोवळ्या प्रसंगानं आपण उगीच कां भिऊन जावं?

'मी गाणं ऐकायला गेलों. बैठक शांतारामच्या सूचनेवरून करण्यांत आली होती. अन् सगळा खर्च तोच करणार होता.

'गाण्याला बरीच प्रतिष्ठित मंडळी होती. गाणारीण बाई दुसरी तिसरी कुणी नसून आतां तूं पाहिलेली कलावंतीण होती.

'गाणं सुरेख झालं. मी गायनाचा शौकी नाहीं, पण त्या गाण्यानं मी खरोखरच्च मोहित झालों. तिच्या सौंदर्यानं मी विकारवश झालों नाहीं. तिच्या सौंदर्यांतहि कसला तरी पावित्र्याचा अंश मला दिसला आणि त्यामुळं असेल कदाचित्, माझी भोगलालसा जागृत झाली नाहीं.

'गायन आटोपल्यावर मंडळीला चहाचा एकेक कप देण्यांत आला. इच्छा नसतांनाहि मला तो घ्यावा लागला. हा कार्यक्रम पार पडल्या-नंतर माझ्या मित्राचा निरोप घेऊन मी एका भटजीकडे झोपलों. शांताराम कुठं झोपला ही चौकशी अर्थातच मीं केली नाहीं.

'दुसरा दिवस इथंच काढून तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी घरीं परतलों. पण तिथं वेगळंच ताट मला वाढून ठेवलं होतं.

' मी घरांत शिरलों, तेव्हां दिवस मावळला होता. माझी वाट पाहत माझा एकुलता एक मुलगा दारांतच उभा होता. त्याची मुद्रा मला चिंताक्रांत दिसली व मी घाबरलों. मी त्यालाच विचारलें,

" वसंत, सगळी मंडळी बरी आहेत ना ?"

" तशीं—आम्ही सगळीं बरीं आहोंत; पण आई सकाळपासून जेवली नाही. सगळा दिवस तिनं रडून काढला आहे."

' वसंतच्या पाठीवर हात फिरवून त्याला धीर देत मी आंत गेलों. माझ्या मागोमाग तोहि आंत आला. मी त्याला विचारलं,

" आई कुठं आहे ?"

" माडीवरच्या खोलींत झोपली आहे."

" अस्सं! तूं इथं रहा थोडा वेळ; मी वर जाऊन येतों."

' जिन्याच्या तोंडाशीच असलेलं दार आंतून बंद करून मी वर गेलों. वरच्या मजल्यावर दोन खोल्या होत्या, त्यांपैकी एक खोली वसुंधरेची होती. खोलीचं दार उघडंच होतं. मी अधीर मनानं आंत पाऊल टाकलं. माझी चाहूल लागली मात्र, पलंगावर पडूनच असलेल्या वसुंधरेनं जमिनीवर माझ्या पायावर स्वतःला पाडून घेतलं व एका क्षणार्धांत तिनं आपलं कपाळ जमिनीवर कचाकच आपटून घेतलं. मी मूढ झालों; पण लगेच भानावर येऊन मीं तिला आवरली. आणखी कपाळमोक्ष करण्यासाठीं तिनं जोराची धडपड केली; पण मीं तिचे हात जोरानं पकडले व बळजबरीनं तिला पलंगावर नेऊन बसवलं. ती स्फुंदत होती, रडत होती. तिचा चेहरा तांबडागुंज झाला होता. तिला बोलतां येत नव्हतं. झालेल्या प्रकारामुळं तिला श्वास लागला होता व तिचा देह थरथर कांपत होता. मीं आधीं तिच्या कपाळाच्या जखमेंतून वाहणारं रक्त पुसून काढलं, जखम धुतली व औषध लावून वर पट्टी बांधली.

' वसुंधरा डोळे झाकून घेऊन पडून राहिली.

' माझ्या सर्वांगाला घाम सुटला होता. विचार व विकार यांच्या दडपणामुळं मी गुदमरून गेलों, रडूं येत होतं; पण तें असह्य निग्रहानं मी दाबीत होतों. त्यामुळं माझा जीव व माझा देह ढवळून, खवळून निघत होता.

' वसुंधरा पलंगावर स्वस्थ पडली होती. दारुण मानसिक यातना भोगीत असल्याप्रमाणं तिचा चेहरा काळवंडला होता. मी हतबुद्ध होऊन तिच्याकडे पाहत होतों.

' माझ्या शीलाचं व सौजन्याचं फळ माझ्यासमोर मला दिसत होतं. माझं शील मीं कुणासाठीं राखून ठेवलं ? वसुंधरेसाठीं. तिचा विश्वास संपादन केल्याशिवाय माझ्या सुखाला परिणति येणार नव्हती. म्हणूनच आपलं वैवाहिक जीवन मीं नीतीनं घालवलं. आपल्या त्यागाची जाणीव दुसऱ्याला नसली, तर त्याग तरी कशासाठीं करायचा ? केवळ शुष्क तत्त्वनिष्ठेसाठींच जगणारा विरळा ! तत्त्वनिष्ठेची महती माणसाला वाटते, ती त्या तत्त्वनिष्ठेचा फायदा इतरांना मिळून ते सुखी होतात हें पाहून ! आपल्या तत्त्वनिष्ठेची हीच ना गत ? जें माणूस सुखी व्हायचं त्याला कांहीं सुख लागलेलं दिसत नाहीं. मग ? इतर पुरुषांप्रमाणं उघड उघड मी पत्नीव्रताचा भंग करीत आलों असतों, तर आज हा दारुण प्रसंग ओढवला नसता. माझ्यापासून एकनिष्ठतेची अपेक्षा करण्यांत तुझी चूक होत आहे, असं मीं तिला सुरुवातीपासून दाखवून दिलं असतं, तर परस्त्रीशीं मी रममाण झालों, असं खात्रीलायक पुराव्यावरून कळून आलं, तरी तिनं असा आकान्त मांडला नसता. पण छीः ! तसं करणं बरं नव्हतं. गुन्ह्याची जाणीव उत्कटपणें आपल्या हृदयांत जागृत असतां आपल्या हातून तसं कृत्य झालं नसतं...

'मीं किती तरी वेळ क्षणांत वेड्याप्रमाणं, क्षणांत शहाण्याप्रमाणं विचार केला. जीव अगदीं आक्रंदूं लागला. विलक्षण त्वेषानं भावना भाजून निघाल्या. मला हें सहन करवेना. मीं वसुंधरेचा हात पकडून तिला विचारलं—

"वसुंधरा, तूं काय केलंस हें?"

'तिनें डोळे उघडून आपली शून्य दृष्टि माझ्याकडे लावली.

"मीं काय केलं? तुमच्या चुकीचं प्रायश्चित्त!"

"कसली चूक मीं केली?"

"जिला कोणतंच प्रायश्चित्त नाहीं अशी?"

"वसुंधरा, स्पष्ट बोल. मीं कोणती चूक केली तें स्पष्ट सांग." मीं तिचा पंजा जोरानें दाबीत म्हणालों.

"तुम्ही परस्त्रीला आपली केलीत."

"तूं खोटं बोलतेस."

"नाहीं. मी सत्य बोलतें. तुम्ही चंद्रा कलावंतिणीशीं व्यभिचार केलात."

"याला पुरावा आहे का तुझ्याजवळ?"

"पुरावा! चंद्राच्याकडे तुम्ही गाण्याला नाहीं गेलांत? तिथं तुम्ही चहा नाहीं घेतलांत? नंतर तुमच्या मित्राबरोबर तिथं झोपायला नाहीं राहिलांत?"

'वसुंधरा खोंचक स्वरांत भेदक नजरेनं माझ्याकडे पाहत मला विचारीत होती. जणूं काय मी गुन्हेगार होतों, अन् ती न्यायाधीश होती.

"मी तिचं गाणं ऐकलं, चहा घेतला; पण तिथं झोंपलों नाहीं."

"तुम्ही खोटं बोलतां."

"वसुंधरा, माझ्या सहनशीलतेला मर्यादा आहे, हें ध्यानांत धर."

" सहनशीलतेचं भय मला कां घालतां? केलं आहे त्यापेक्षां तुम्ही अधिक वाईट तें काय करूं शकाल?"

" इतक्या चांगल्या रीतीनं वागल्याचं हें बक्षिस ना?"

" तुमच्या वागण्याचा तुम्हांला पुरावा पाहिजे वाटतं? माझी कल्पना नव्हती तुम्ही एवढं धाडस कराल असं! तुमचं शील, तुमचं सद्वर्तन, हें ढोंग होतं नुसतं! ढोंगाच्या या पांघरुणाखालीं राहून तुम्हीं गेल्या वीस वर्षांच्या वैवाहिक आयुष्यांत काय केलं असेल परमेश्वराला माहीत! लोकांनीं तुमची यथेच्छ स्तुति करावी, अन् मीं पिशीनं त्या स्तुतीवर विश्वसून उगी राहावं! 'साप म्हणूं नये धाकला अन् नवरा म्हणूं नये आपला!' जन्मभर रडणं हेंच आम्हां स्त्रियांचं नशिब! तुम्ही मला दुसरं काय करायला लावणार?"

'ती रडत होती, अन् बोलत होती. तिच्या शब्दापुढं माझं आयुष्य मातीमोल झालेलं मला दिसत होतं. अधिक वेळ तिथं राहणं मला असह्य झालं व मी तिथून उद्वेगानं बाहेर निघालों.

* * *

'दोन दिवस निघून गेले. मला तीं दोन वर्षेंच वाटलीं. मला वाटलं मी या घरांत निर्माल्य आहे. मी म्हणून कुणी प्राणी आहे ही जाणीव नसल्याप्रमाणं वसुंधरा तुच्छतापूर्वक वागली. आम्ही परस्परांशीं बोललों नाहीं. वसंताला जवळ घेऊन मी रडलों. त्याला कुशींत घेऊन दोन रात्री मीं तळमळत काढल्या.

—पण तिसऱ्या दिवशीं एक एकंदर दिव्य माझ्या भेटीला यायचं होतं.

'तो दिवस गुरुवारचा होता. मी दत्तमहाराजांचा उपासक असल्या-

मुळं गुरुवार हा माझ्या व्रताचा दिवस होता; म्हणून मी आंघोळ करून सोवळ्यानं देवाच्या खोलींत गुरुचरित्र वाचीत बसलों होतों.

'मधेंच कुणी तरी बाहेरून 'बाबासाहेब' अशी हाक मारली. मीं बाहेर नजर टाकली आणि दाराशीं चंद्रा कलावंतिणीची मूर्ति दृष्टीस पडतांच माझ्या काळजांत कुणी तरी खंजीर खुपशीत आहे असं मला वाटलं. अमर्याद सहनशीलतेनं मीं मान खालीं घातली व अध्याय वाचूं लागलों.

'थोडया वेळानं माझं वाचन संपलं. जें घडायचं तें टाळून टळत नाहीं हेंच खरं! विलक्षण निग्रहानं व शांततेनं मी बाहेर आलों व चंद्राकडे पाहिलं.

"काय चंद्रा! तूं इकडे कुणीकडे?"

"बाबासाहेब, अशी काय थट्टा करायची ती?"

"चंद्रा, कसली थट्टा केली मीं तुझी?"—मीं गंभीरपणानं विचारलं.

'ती मनांत घाबरली होती. पण तिनं धीर करून पुढं म्हटलं,

"बाबासाहेब, आपल्याला शोभतं का हें? मी कलावंतीण झालें तरी इकडे येणं कांहीं मला आवडलं नाहीं. आपण एवढे मोठे लोक! तेव्हां आपल्या शब्दाला मान देण्यासाठीं म्हणून मीं इथं येण्याचं धाडस केलं."

"म्हणजे? मी नाहीं समजलों तुझ्या बोलण्याचा अर्थ!"

'हा वेळपर्यंत माझी अशी कल्पना होती, कीं वसुंधरेनं हिला त्या गोष्टीची शहानिशा करून घेण्यासाठीं बोलावलं आहे."

"माझं बोलणं अगदीं सरळ आहे. तुम्हींच पत्र लिहून ताबडतोब मला बोलावलंत ना?"

"कुणी ? मीं ? चंद्रा, तुझं मस्तक ठिकाणावर आहे ना ?" मीं संतापानंच विचारलं.

"हो, तुम्हीच. हें पहा तुमचं पत्र. आम्हां गरीबांची अशी शोभा करण्यात तुम्हांला मोठी गंमत वाटत असेल, नाहीं ?"

'तिनं पुढं केलेलं पत्र मीं थरथरत हातांत घेतलं, अन् त्याची घडी उघडून खालील भयंकर मजकूर वाचला:—

"प्रिय चंद्रा,

जत्रेच्या दिवशीं तुझं गायन ऐकलं. त्या वेळेपासून मी तुझ्या नादानं वेडा झालें आहे. तुझा सहवास लाभल्याखेरीज मी आयुष्यांत सुखी होणार नाहीं. तुझ्या सहवासाचं भाग्य मला लाभेल का ? हें पत्र हातीं पडतांच तूं इथं निघून आलीस, तर मी असं समजेन, कीं तुझं प्रेम मला द्यायला तूं आतुर झाली आहेस. तसं घडलं तर तूं नेहमींच माझी होशील.

तुझ्या सहवासाला भुकेलेला

— **बाबासाहेब**"

'मरणाची शिक्षा देणारा न्यायाधिशाचा निकालसुद्धां इतका कठोर असणार नाहीं, असं मला त्या वेळीं वाटलं. हताश होऊन मीं डोळे मिटून घेतले. अन् स्वस्थ पडून राहिलें.

'चंद्रा हें पाहून दचकली. तिला वाटलं, मी बेशुद्ध झालें. ती झटकन् आंत धावली व पाण्यानं भरलेला तांब्या आणून तिनं थोडं पाणी माझ्या चेहऱ्यावर सपासप मारलं, व दोन्ही हातांनीं माझं मस्तक धरून तें हलवीत म्हटलं,

"बाबासाहेब, काय झालं तुम्हांला ? उठा ना. डोळे उघडा. देवा, कुठली मला बुद्धि झाली !"

'मीं डोळे उघडले. तिच्या नेत्रांत पाणी थरकत होतं. ती स्फुंदत होती. मीं तिच्याकडे पाहत म्हटलं,

"चंद्रा, तूं घाबरूं नकोस. मी आतां बरा आहे."

'दोन्ही हात जोडून मला नमस्कार करीत ती काकुळतीच्या स्वरांत म्हणाली,

"बाबासाहेब, मीं आतां जातें. मला क्षमा करा."

"चंद्रा, थोडा वेळ थांब."

'दोन वस्तूंच्या घर्षणानं विशिष्ट उष्णता उत्पन्न झाली, म्हणजे विजेची ठिणगी पडते. या घटनांच्या आंचीनं माझ्या सगळ्या-सगळ्या सुप्तासुप्त शक्ति वर उसळून आल्या आणि त्यांनीं कोणता तरी एक निश्चय करायला मला भाग पाडलं.

"चंद्रा, आज गुरुवार आहे. माझ्या व्रताचा दिवस आज. माझ्या हातून चूक घडली तर दत्तमहाराज मला क्षमा करोत. चल आपण खालीं जाऊं."

'वृत्तीची—निश्चयाची अस्थिरता असली म्हणजेच विकार प्रबल होऊन जीव हैराण करतात. निश्चय ठरला म्हणजे मग मनाला समाधान लाभतं व विकारांचा उपशम होतो. माझं मन आतां शांत, स्थिर, कठोर झालं. माझा निश्चय ठरला.

'मी उठून खालीं आलों, माझ्या मागोमाग चंद्राहि भीतभीत आली.

'वसुंधरा माजघरांत होती तिथं मी तडक गेलों. घरची इतर मंडळीहि तिथं लवकरच जमा झाली. पण तिकडे माझं लक्षच नव्हतं.

'मी वसुंधरेजवळ गेलों. तिची वृत्ति अजित होती. पश्चात्तापाची कोणतीच खूण तिच्या चेहऱ्यावर नव्हती.

'मी पत्र पुढं करीत निश्चयी पण कातर स्वरांत वसुंधरेला म्हटलं,

"चंद्राला इथं कुणी आणलं?"

"तुमच्या कृतीनं. तिचं आगमन हाच तुमच्या वर्तनाचा पुरावा आहे. तुम्हांला पुरावा हवा होता ना? तुमचा इच्याशीं संबंध नसता तर ही अशी इथं धावून आली असती का?"

"अस्सं! अन् हें पत्र कुणी लिहिलं?"

"मीं."

"अन् ही सही कुणी केली?"

"मीं."

"ठीक. हें पत्र मी खोटं ठरूं देणार नाहीं. चंद्रा, आजपासून तूं माझी आहेस. चल, आपण बरोबरच जाऊं."

'मी कोटटोपी घालून बाहेर आलों. घरची व्यवस्था कशी राखायची तें थोडक्यांत कारभाऱ्याला सांगितलं. जवळच वसंत रडत होता; त्याला मिठी मारून मीं म्हटलं,

"वसंत, चल ये माझ्याबरोबर."

'वसंत माझा प्राण होता. आईनं त्याला जन्म दिला होता; पण मीं त्याला वाढवलं होतं. त्याच्या आयुष्याच्या चित्रांत भावना व विचार यांचे रंग मीं भरले होते.

'वसंत गोंधळला. तो धावतच आईकडे गेला. त्यानं तिला मिठी मारली. तिनं त्याचं मस्तक कुरवाळलं. नंतर तो रडतच माझ्याकडे आला.

"वसंताला हातांत धरून मीं मोटारींत बसवलं. माझ्या शेजारीं चंद्रा बसली.

' मोटार चालूं लागली. माझं घर, माझ्या पूर्वजांचं घर, थोडयाच वेळांत अदृश्य झालं; अन् तेव्हांपासून आज एक वर्ष झालं, मी इथं आहे.'

बाबासाहेब थोडा वेळ थांबले. नंतर गहिंवरलेल्या स्वरांत त्यांनीं हळूच हाक मारली—

" वसंत ! वसंत ! "

अन् लगेच दहाबारा वर्षांचा वसंत धावतच वर आला. बाबासाहेबांच्या सद्‌गुणांचं तें एक निरागस व मनोहर प्रतीक होतें. त्याला मांडीवर घेऊन, हळुवारपणें त्याचें मस्तक कुरवाळीत, स्निग्ध पण भेदक स्वरांत ते म्हणाले,

" माझं आयुष्य हें असं आहे ! "

—आणि त्यांनीं आपली दृष्टि खिडकींतून बाहेर अंतराळांत लावली, जणूं काय तो मोडलेला माड ते पुन्हा पाहत होते.

---

# राण्याचें ब्रीद

बोलतां बोलतां राण्याच्या बंडासंबंधीं गोष्टी निघाल्या आणि शिंगुबाबांनीं शेवटच्या बंडांतील आपला एक रोमांचकारी अनुभव सांगायला सुरुवात केली. त्यांच्या तोंडून निघणारी प्रत्येक कहाणी आम्ही मुलें मोठ्या उत्सुकतेनें, कुतूहलानें ऐकत असूं. कारण त्यांचें जीवनच वीरवृत्तीचें होतें. आणि अशा विविध, उत्कट जीवनांत त्यांना वेळोवेळीं जे प्रसंग अनुभवायला मिळाले होते त्यांचें वर्णन करतांना ते विषयाशीं समरस होऊन जात; त्यांच्या गंभीर, राकट व निर्भय चेहऱ्यावर विलक्षण उल्हास खेळूं लागे; त्यांच्या थकलेल्या नेत्रांत तारुण्याचें चैतन्य रसरसूं लागे. शब्दांबरोबरच त्यांच्या अवयवांच्या हालचालींतून मूर्तिमंत वीररस प्रकट होत असे, आणि त्यामुळें आमच्यासारखे श्रोते त्यांच्या कथनांत रंगून जात.

'तो काल मोठ्या धामधुमीचा होता.' शिंगुबाबांनीं प्रारंभ केला.

'एखाद्या टोळधाडीनंतर निसर्ग बेचिराख होऊन जावा तद्वत् बंड-खोरांचा लोंढा एखाद्या गांवांतून निघून गेला म्हणजे त्या गांवांत हाहाःकार उडत असे. लुटालूट, जाळपोळ, मारहाण कांहीं विचारूं नका! एरवीं माणसाप्रमाणं वागणारे बंडखोर त्या वेळीं राक्षस बनत. आज एक गांव तर उद्यां दुसरा, असा त्यांचा लुटालुटीचा क्रम होता. त्यामुळं कोणत्या गांवावर केव्हां संकट येईल त्याचा नेम नसे. मरणाची, बेअब्रूची धागधूग सगळ्यांच्या हृदयाला जाळीत असायची. अशाच वेळचा माझा एक अनुभव मी तुम्हांला आतां सांगणार आहे.'

ते थोडा वेळ थांबले. अंधाराची रहस्यमयता निसर्गावर पसरूं लागली. जवळच्या नदीच्या पाण्यांत तीरावरच्या झाडांच्या काळ्याभोर सावल्या हलूं लागल्या. दूरच्या झाडींतून कोल्हेकुईचा कर्णकटु आवाज निघूं लागला.

'—आणि एक दिवस अकस्मात् दुपारच्या वेळीं बंडवाल्यांनीं आमच्या गांवावर छापा घातला. बंडखोरांचं शक्य त्या उपायांनीं पारिपत्य करण्याचं आम्हीं कांहीं मंडळींनीं आधींच ठरवलं होतं. त्याप्रमाणं गांवांत त्यांचा प्रवेश होत आहे असं कळतांच वाड्यावरची बरीच मंडळी आमच्या घरांत गोळा झाली. आमच्याकडे तोड्याच्या चांगल्या दहा-पंधरा बंदुका होत्या आणि दारूसामानहि भरपूर होतं. बंदुकीचा बिनचूक नेम मारणारेहि दहा-पंधरा तरुण होते. घराचीं दारं बंद करून आम्ही पंधरावीस पुरुषमंडळी आपल्या बंदुका घेऊन वेगवेगळ्या ठिकाणीं बसून राहिलों. बंडवाल्यांनीं घराला वेढा दिला आणि दरवाजा उघडत नाहीं असं पाहून त्याच्यावर कुऱ्हाड चालवली. त्यांची बाहेर चालू असलेली आरडाओरड आणि अभद्र शिव्याशाप आम्हांला ऐकूं येत होतेच. दारांना व भिंतींना मुद्दाम राखलेल्या

भोंकांतून आम्हांला बंडवाल्यांची सगळी हालचाल दिसत होती. बंडवाल्यांची जाळपोळ व अत्याचार करण्याची तयारी पाहून माझ्या सोबत्यांना मीं गोळ्या झाडण्याची सूचना केली. त्याबरोबर लागोपाठ पंधरा-वीस बार झाले आणि आमच्या अंगणांत आठ-दहा बंडवाल्यांचे मुडदे पडलेले आम्हांला दिसले. हा अनपेक्षित गोळीबार झालेला पाहतांच इतर बंडवाले भीतीनं गांगरून सैरावैरा पळूं लागले आणि थोडयाच वेळांत त्यांनीं गांव सोडला.

'ह्या प्रकरणांत कल्पनातीत विजय मिळाल्यामुळं आम्ही कांहीं दिवस निश्चित होतों. बंडवाले आतां कांहीं आमच्या वाटेस जात नाहींत अशी आमची समजूत झाली. परंतु दहा-पंधरा दिवसांनंतर घडलेल्या प्रकारामुळं आम्ही स्तिमितच होऊन गेलों.

'पहाटेची वेळ होती. अजून उजाडलं नव्हतं. इतक्यांत गांवांत ठिक-ठिकाणीं आरडाओरड व धावपळ सुरू झाली. मी दरवाजा उघडून धावतच बाहेर आलों. इतक्यांत आठदहा बंडवाले पाण्याच्या लोंढ्या-प्रमाणं घरांत शिरले. त्यांचे चित्रविचित्र पोषाक व भयानक मुद्रा आणि त्यांच्या हातांत तळपणारीं शस्त्रास्त्रं पाहून मी क्षणमात्र गांगरून गेलों. परंतु लगेच धीर करून मी घरांत धावलों. इतक्या अवधींत घरची मंडळी कावरीबावरी होऊन खोलीच्या एका कोपऱ्यांत जमा झाली होती, आणि आमच्या कुलदेवतेचं नामस्मरण करून रडत होती. मीं त्यांना धीर दिला.

' बंडवाल्यांनीं घरांतील बरीच चीजवस्त हस्तगत केली होती. परंतु त्या गडबडींत तिकडे कुणाचंहि लक्ष नव्हतं. त्या संकटांतून घरचीं माणसं सुखरूप कशीं निभावतील हीच मला चिंता लागली होती.

' दोन बंडवाले, आम्ही होतों त्या खोलींत शिरले आणि त्यांपैकीं

एकानं दागिने काढण्याच्या हेतूनं माझ्या आईचा हात पकडून खसकन् ओढला व अंगावरील दागिने उतरून ताबडतोब देण्यास सांगितलें. तें पाहून संतापानं माझं भान हरपलं. मीं चटकन् कोपऱ्यांतली बंदूक काढली आणि ती उभारून त्याच्यावर गोळी झाडणार इतक्यांत, त्या दोघांनींहि माझे दंड पकडून मला गिरफदार केलं. माझी सगळी धडपड व्यर्थ गेली. त्यांच्या साहाय्याला त्यांचे इतर सोबती आले आणि त्यांनीं मला पकडून ठेवलं.

'थोड्या वेळानं बंडवाले रस्त्यावर जमा झाले आणि त्यांनीं शिंगाला फुंक घातली. त्याबरोबर गांवांत पांगलेले त्यांचे इतर सोबती तिथं हळूहळू दाखल होऊं लागले. या जमावांत गांवचे दोन प्रतिष्ठित वृद्ध गृहस्थ पकडून आणलेले मला दिसले. मीं मनांत म्हटलं, 'आतां मृत्यूशीं झुंज खेळायची.'

'फिरून शिंगाला फुंक पडली आणि पन्नास-साठ इसमांच्या त्या टोळीबरोबर रानाच्या दिशेनं आम्ही चालूं लागलों.

'आम्ही रानांत पोंचलों तेव्हां अकराचा सुमार होता. सूर्याचे किरण प्रखर झाले होते आणि दिवस चैत्र महिन्यांतील असल्यामुळं अतिशय उष्मा होत होता. वाट दगडाधोंड्यांतून आणि कांटेरी झुडपांमधून गेली होती. सभोंवतीं मोठमोठ्या झाडांच्या असंख्य फांद्यांच्या जाळ्या दिसत होत्या. उंच-सखल जमिनींतून ओहळांचीं शुष्क पात्रं दिसत होतीं.

'आम्ही हळूहळू एका मोठ्या डोंगराची चढण चढत होतों. मला माझ्या जीविताची पर्वा नसली तरी घरच्या मंडळींचा प्रश्न मला क्षणाक्षणाला भेडसावीत होता. आणि त्याहिपेक्षां माझ्या मागून कष्टानं चालणाऱ्या दोघां म्हाताऱ्यांची स्थिति पाहून मला अतिशय दुःख

होत होतं. आम्हां तिघांचंहि जीवित संकटांत सापडलं होतं. गांवांतील तीन प्रमुख घरांतील आम्ही कर्ते पुरुष होतों. आणि बंडवाल्यांचं जें भयंकर पारिपत्य आम्हीं केलं होतं, याचं उट्टं काढण्यासाठींच आम्हांला अज्ञात स्थळीं नेण्यांत येत होतं.

' माझे म्हातारे सोबती धक्के दिल्याप्रमाणं चालत होते. कल्पनातीत भयाण अशा शारीरिक व मानसिक दुःखाचा ते अनुभव घेत होते. तारुण्याचा उन्माद मृत्यूशीं झगडण्याची ताकद मला देऊं शकत होता. परंतु त्यांचं वार्धक्य त्यांना अगतिक, निराश बनवीत होतं. ते कापत होते आणि त्यांच्या अंगांतून घामाच्या धारा निघत होत्या. एखाद्या वेळीं ते मधेंच खिळल्याप्रमाणं थांबत, आणि हृदयाचं पाणी-पाणी करून टाकणारे आपले नेत्र मागं वळवून कल्पनेला दिसणाऱ्या आपल्या घरांदारांवर, आपल्या बायकांमुलांवर स्थिर करीत. त्या वेळीं मागं चालणारे बंडवाले त्यांच्या पाठींत किंवा कंबरेंत बंदुकीचा दस्ता हाणीत. अशा वेळीं त्यांच्या तोंडून निघणारे कळवळ्याचे उद्‌गार मला असह्य होत आणि मी क्रुद्ध नजरेनं त्यांच्याकडे वळून पाही.

' आमच्या टोळीचा मुख्य रामचंद्र राणे या नांवाचा एक पोक्त इसम होता, पण तो नामधारीच. टोळीच्या सगळ्या हालचाली विसाजी नांवाच्या एका मस्त बंडखोराच्या इच्छेनुरूप होत होत्या. आपल्या कनिष्ठ साथीदारांना व पकडलेल्या इसमांना तोच मारहाण करी. कोणत्या वाटेनं टोळीनं जायचं हें तोच ठरवी. तो जातीचा राणा नव्हता. त्याचं स्वरूप आणि त्याचे गुण पाहिले म्हणजे तो अडाणी, हलकट जातींत जन्मला आणि वाढला असावा असं तेव्हांच दिसून येई. त्याचा पोषाक त्याच्या रूपाप्रमाणंच भयानक होता. ढुंगणाला एक तांबड्या रुंद किनारीचं मळकट धोतर, अंगांत आखूड बाह्यांचा काळा

डगला, माथ्यावर एक तांबडी टोपी, गळ्यांत काळे, जाड आठ-दहा दोर, डाव्या हातांत एक रुप्याचं भलं मोठं कडं, पायांत दोन-दोन इंच जाड तळांच्या राक्षसी वहाणा, खांद्यावर त्याची ती बंदूक आणि कंबरेला दीड हात लांब पात्याचा सुरा, अशा थाटांत ती स्वारी जमावाबरोबर आपले क्रूर मोठाले डोळे सगळीकडे फिरवीत चालूं लागली म्हणजे कुणाहि मनुष्याला त्याची भीतीच वाटायची.

'विसाजी बंदिवानांकडे क्रूरतेनं पाहूं लागला म्हणजे रामचंद्र राण्याच्या नजरेंत कारुण्याची सौम्य चमक उत्पन्न होई. त्याचा गंभीर चेहरा दारुण दुःखानं मलूल होई. आणि विसाजीचं वर्तन असह्य झालं म्हणजे सहनशीलतेचा बांध फोडून त्याचं मन त्वेषानं तडफडूं लागे, अन् त्याच्या तोंडून विसाजीचा धिक्कार करणाऱ्या स्वरांत उद्गार निघे, "विसाजी! आमचो सत्यानाश करतोलो तूं तुज्या या कर्मान." अशा या धिक्काराच्या वेळींच विसाजी अधिक भयाण दिसे. कारण आपल्या नायकानं सगळ्यांच्या समक्ष आपल्याला तुच्छतेचे, तिरस्काराचे शब्द बोलावे हें त्याला खपत नसे; तरी पण गलितगात्र दिसणाऱ्या त्या म्हाताऱ्याच्या शब्दांची धार त्याचा सगळा ताठा कातरून टाकायला समर्थ होती.

'राण्याचं सौजन्य मीं लवकरच मोजलं; आणि त्या सौजन्याच्या जोरावरच आपल्याला या संकटांतून मुक्त होतां येईल अशी मीं खूणगाठ बांधली.

'चालतां चालतां एका अवघड ठिकाणीं माझा एक सोबती—सदूभाऊ थांबला. त्याच्यानं पाऊल पुढं टाकवेना. मला पाहून तो लहान मुलाप्रमाणं रडूं लागला. इतक्यांत विसाजीनं त्याच्या कमरेंत बंदूक हाणली. श्रमानं जर्जर झालेला म्हातारा कोलमडून खालीं

पडला. ' देवा ! ' हा निर्वाणीचा शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडला तेवढाच. त्यानं हालचाल केली नाहीं. तो तत्काल गतप्राण झाला.

' त्याच्याजवळ जाऊन राणा त्याच्या शवावर वाकला, तेवढ्यांत त्याच्या नेत्रांतून दोन अश्रु ओघळून सदूभाऊंच्या देहावर सांडलेले मला दिसले. राण्याचा चेहरा कसल्या तरी पश्चात्तापानं भरून गेला. अवघ्या पांच-दहा मिनिटांत हा प्रकार घडून आला आणि नंतर सदूभाऊंचं प्रेत तिथंच टाकून टोळी पुढं चालूं लागली.

' दोन-तीन तास आम्ही याप्रमाणं चालत होतों. रामचंद्र राणा माझ्यापुढं चालत होता. तो फिरून फिरून माझ्याकडे वळून पाही. चालतांना बोलण्याचा त्याला भारी नाद होता. मी संभाषणांत वाकबगार असल्यामुळं त्याचं लक्ष मीं माझ्याकडे लगेच वेधून घेतलं. मला हवी असलेली गोष्ट राण्याचं मन काबीज केल्याशिवाय घडणं शक्य नव्हती.

' आम्ही एका माळरानावर पोंचलों. तिथं पिंपळाचा एक पार होता त्यावर आम्ही उतरलों. बंडवाल्यांनीं लुटून आणलेली चीज-वस्त एका जागीं गोळा केली. रोकड नाणं एका ठिकाणीं ठेवलं आणि सगळेजण स्वयंपाकाच्या तयारीला लागले.

' तासाभरानं जेवणंखाणं झाल्यावर बंडवाले जिकडे तिकडे बसले. रामचंद्र राण्यानं आधीं ज्याच्या त्याच्या लायकीप्रमाणं रोकड वाटली. नंतर नेहमींच्या पद्धतीप्रमाणं जमलेल्या दागिन्यांच्या लिलांवाला सुरुवात झाली. राण्यानं एकेक दागिना वर उचलावा, त्याची किमान किंमत तोंडानं उच्चारावी, लगेच कोणी तरी त्या किंमतींत वाढ करावी, आणि नंतर जास्तींत जास्त किंमत देणाऱ्याला तो दागिना बहाल करावा, असा क्रम चालला. राण्यानं हातांत एक बुगडीचा जोड घेऊन पुकारा केला. तो दागिना पाहतांच मी दचकलोंच ! माझ्या आईच्या आवडीचा

दागिना होता तो. विसाजीनं पहिला शब्द टाकला. राण्यानं तोंड हलवीत म्हटलं,

"— बुगडयांचा जोड दोनशें रुपयांक वता."

" सगळी मंडळी तटस्थ झाली. कोणीहि दुसरा शब्द टाकला नाहीं. राण्यानं थोडा वेळ वाट पाहून म्हटलं, पहिली खेप...दुसरी खेप..."

' मला कुठून बुद्धि झाली कुणाला ठाऊक. मी अकस्मात् बोलून गेलों, "म्हजे तीनशीं."

' सगळ्यांनीं आश्चर्यानं माझ्याकडे पाहिलं. विसाजीचं तोंड काळं-ठिक्कर पडलं. त्याचा मीं भयंकर पाणउतारा केला. अशा अर्थाच्या मुद्रेनं त्यानं माझ्याकडे पाहिलं. त्यानं चटकन् आवेशाच्या भरांत बंदुकीला हात देखील घातला; पण लगेच रामचंद्र राण्यावर नजर जातांच त्याचा हात खालीं आला. त्यानं संतापानं आपले ओठ चावले व हळूच एक हिडिस शिवी मला दिली.

' राण्यानं जोड माझ्यापुढं करीत हसत हसत म्हटलं,—" शाबास बामना !"

' इतर बंडवाल्यांनीं जोरानं टाळ्या वाजवल्या. विसाजीच्या डोळ्यांत सूडाची चमक तळपली. मी क्षणमात्र चरकलोंच.

' थोड्या वेळानं बंदुकीचा बार ऐकूं आला आणि आमच्या जमावांत गडबड उडाली. सगळ्यांनीं आसपास पाहिलं. बंडवाल्यांवर सरकार-पक्षीय सैनिक गोळीबार करण्याच्या हेतूनं जवळपास दडून बसले असावेत यांत शंकाच नव्हती. बंडवाल्यांनीं चारी दिशांनीं बंदुका झाडल्या. मनाच्या कातर, अस्वस्थ स्थितींत कांहीं क्षण निघून गेले.

' पण लवकरच राण्याला चाटून एक गोळी वडाच्या बुंध्यांत घुसली. राणा वडाच्या बुंध्याला टेकून पारावर बसला होता आणि खाली

जमिनीवर मी बसलों होतों. राण्यावर झाडलेली गोळी चुकून वडांत घुसली हें लक्षांत येतांच मी जाग्यावरून ताडकन् उठलों आणि राण्याच्या पुढं बसून माझ्या देहाची मीं त्याच्यापुढं ढाल केली. तसं करतांना माझ्या मनांत कोणते विचार आले असावेत तें मला सांगतां येत नाहीं. शिकारीच्या निमित्तानं बहुतेक लष्करी व पोलिस अधिकाऱ्यां-शीं माझी दाट ओळख असल्यामुळं ते माझ्यावर गोळी घालणार नाहींत ही मला खात्री असावी. कदाचित् राण्याचा जीव वांचवला पाहिजे, मग मी मेलों तरी हरकत नाहीं, ह्या एकाच भावनेनं मीं तें धाडस केलं असेल.

'ज्या बाजूनं पहिली गोळी आली त्या बाजूला कांहीं बंडवाल्यांनीं धाव घेतली. त्यांनीं आठ-दहा बार काढले. शत्रु लवकरच दिसेनासा झाला.

'रामचंद्र राणा मात्र शांत होता. गोळी दोन बोटं अंतरावर झाडांत रुतली हें त्यानं पाहिलं. पण त्याची मुद्रा पालटली नाहीं. भीतीचा लवलेश तिथं दिसला नाहीं. माझ्याकडे स्नेहार्द्र कौतुकाच्या नजरेनं पाहत त्यानं म्हटलं,— " बामना, तूं कित्याक मरतासा ? "

'मरणाला तुच्छ लेखणारा पण दुसऱ्यांचे त्रास पाहून कष्टणारा रामचंद्र राणा मला किती तरी थोर दिसला. घराण्याची परंपरा राखण्या-साठीं तो बंडांत सामील झाला होता. बंडाचं आधिपत्य स्वीकारण्या-ची पवित्र, धार्मिक जबाबदारी आपल्यावर आहे या जाणीवेनं किती तरी थोर मनाचे राणे बंडांत सामील होऊन मरून गेले. त्यांपैकींच रामचंद्र राणा हा एक होता.

'याप्रमाणं एक एक दिवस जात होता. प्रवासांतील दगदगीमुळं, हालअपेष्टांमुळं माझा दुसरा म्हातारा सोबती वाटेंत थोड्याच दिवसांत

वारला होता. तिघांपैकीं मी शिल्लक राहिलों होतों. पण त्यांच्याचप्रमाणं मीहि मृत्यूची वाट केव्हां धरीन याचा नेम नव्हता. मला जगांतून नाहींसा करण्यासाठीं विसाजीची बंदूक नेहमींच सज्ज होती. रामचंद्र राण्याची सहानुभूति माझ्या पाठीशीं उभी नसती तर लिलांवाच्या वेळींच माझं मरण ओढवलं असतं.

'आमची टोळी गांवोगांव फिरत असे आणि तिच्याबरोबर मलाहि जावं लागे. लुटालुटींत अर्थातच मला भाग घ्यावा लागत नसे. गांवा-लगतच्या एखाद्या रानांत मी, रामचंद्र राणा व आणखी एक दोन बंडवाले इतकी मंडळी बसून राहत असूं. केव्हां केव्हां राणा हल्ल्यांत सामील होई.

'या पंधरावीस दिवसांत मी बहुतेक बंडखोरांना प्रिय होऊन बसलों होतों. मुक्कामाच्या वेळीं मी राण्याच्या शेजारीं बसून निर-निराळ्या विषयांवर तासन् तास बोलत राही. त्या वेळीं सगळी मंडळी आमच्याभोंवतीं बसून एकाग्र चित्तानं माझ्या तोंडून निघणारा शब्द न् शब्द ऐकत असे. रामायण, महाभारतांतील रोमांचकारी कथा, इतिहासकालीन निरनिराळ्या युद्धांचीं वर्णनं, वर्तमानकालीन जागतिक घडामोडी इत्यादींसंबंधीं माझीं व्याख्यानं ते समरस होऊन ऐकत. माझी ही लोकप्रियता विसाजीला असह्य होई. कारण तिच्यामुळं माझ्या शिक्षेचा--म्हणजे माझ्या मृत्यूचा प्रश्न लांबणीवर पडत होता.

'पण जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशी मृत्यूची भीति मला सर्वस्वीं सोडून गेली. धामधुमीच्या प्रसंगीं माणसाचं असंच होतं. तो मूळचा भित्रा असला तरी धाडसी बनतो. माझंहि तसंच झालं. परंतु मृत्यूच्या भीतीनं नव्हे तर घरच्या मंडळींच्या आठवणीनं. मला आतां घरीं जावं असं फार फार वाटूं लागलं. संधि साधून मी राण्याला तसा

प्रश्न केला. त्याला माझा प्रश्न ऐकून आनंद झाला पण तितकंच वाईट वाटलेलं दिसलं. मला वाटत होतं तितकी माझी मुक्तता सोपी नव्हती. कारण आमच्या गांवांत आमच्या घराच्या अंगणांत मारल्या गेलेल्या आठ-दहा बंडखोरांच्या मृत्यूच्या सूडाच्या हेतूनंच त्या बंडखोरांनीं मला पकडून आणलं होतं. अशा स्थितींत मला मोकळा करण्यानं त्यांचा स्वाभिमान दुखत होता. सुरेख गोष्टी सांगणारा या दृष्टीनं मी त्यांना हवा होतों. पण त्यांच्या सोबत्यांना मारणारा त्यांचा भयंकर शत्रु ह्या दृष्टीनं माझा मृत्यु त्यांना हवा होता.

'शेवटीं एक दिवस त्यांची सभा भरली. विसाजीनं माझी मुक्तता होऊं नये, उलट मला गोळी घालून ठार करावं अशा अर्थाचं भाषण केलं. त्याच्या कांहीं सोबत्यांनीं त्याला पुष्टि दिली.

'रामचंद्र राण्यानं आपल्या संथ गंभीर वाणीनं माझी तरफदारी करून माझी मुक्तता करण्यांत यावी असं सांगितलं. मी जातीनं 'बामण' असलों तरी वृत्तीनं वीर आहे आणि बंडखोरांना जवळचा आहे, तेव्हां मला मारणं उचित होणार नाहीं अशी त्यानं माझ्यातर्फे मखलाशी केली. या दोन भिन्न मतांत तोड काढण्यासाठीं एका म्हाताऱ्यानं असं सुचविलं कीं, प्रायश्चित्त म्हणून त्यांच्या देवतेपुढं हजार रुपये ठेवून मग मीं घरीं जावं. राण्याला हें म्हणणं मान्य झालं व बऱ्याच बंडखोरांनीं त्याला पाठिंबा दिला. विसाजीला ही गोष्ट पसंत पडेना. त्यानं आग्रह धरला, कीं जर तुम्ही देवतेचं नांव पुढं करतां तर कैद्याची वाट कशी लावावी हें तिलाच कौल लावून विचारा. राण्यालाहि या मताविरुद्ध कांहींच बोलतां येईना. त्यानंहि या म्हणण्याला मान्यता दिली, आणि माझ्या आयुष्याची दोरी देवतेच्या कौलावर—प्रसादावर—अवलंबून राहिली.

* * *

'शेवटीं सत्तरीच्या एका रानवट गांवांत मला नेण्यांत आलं. तिथंच बंडखोरांचं देऊळ होतं. मला देवळांत नेण्यांत आलं. माझ्याबरोबर रामचंद्र राणा, विसाजी व इतर दहा-बारा प्रमुख बंडखोर होते. त्यांपैकीं एका म्हाताऱ्यानं देवतेच्या पाषाणी मूर्तीला प्रसाद लावला. 'बंदिवानाला सोडून द्यावं तर डावीकडची कळी दे.' असं त्यानं मागणं केलं. ते कांहीं क्षण मला कसे वाटले हें मीं सांगितलं पाहिजे असं नाहीं. सगळी मंडळी तटस्थ होऊन मूर्तीच्या अंगावर लावलेल्या पाकळ्यांकडे अनिमिष नेत्रांनीं पाहत होती.

'देवतेनं मला अनुकूल कौल दिला. माझी मुक्तता व्हावी, पण देवतेला मी शक्त्यनुसार कांहीं द्यावं असं सर्वानुमतें ठरलं. राण्यानं माझ्या पाठीवर उल्हासानं थाप मारली. विसाजीची चर्या अधिकच भेसूर झाली.

'दुसऱ्या दिवशीं मीं एका जासुदामार्फत घरीं पत्र लिहिलं. त्यांत मी लवकरच घरीं परत येईन असं कळवून माझ्या मुक्ततेसाठीं पांचशें व लिलावांत घेतलेल्या बुगडीच्या जोडाचे तीनशें मिळून आठशें रुपये पाठवून देण्याबद्दल आईला लिहिलं.

'दोन दिवसांनीं रक्कम माझ्या हातीं पडली. माझ्या मुक्ततेची वेळ ठरविण्यांत आली. सगळे बंडवाले देवळाच्या मंडपांत जमा झाले. माझ्याकडून देण्यांत येणाऱ्या रकमेचा कांहीं हिस्सा प्रत्येकाला मिळणार असल्यामुळं ते आनंदित होते. विसाजीचा चेहरा मात्र भयानक दिसत होता. मीं त्याचा केलेला अपमान त्याला जाळीत होता; आणि माझ्या मुक्ततेची वेळ हळूहळू जवळ येत चालली होती हें पाहून तो दुखावलेल्या वाघासारखा झाला होता. देवतेच्या अनुकूल प्रसादामुळं सगळे लोक

मला अनुकूल झाले होते. कोणत्याच उपायांनीं आतां माझी मुक्तता होण्याचं टळत नव्हतं. विसाजीचा सगळा दुष्टपणा, सगळी शक्ति अपेशी ठरली होती.

'नंतर मी इतर बंडवाल्यांचा निरोप घेऊं लागलों. त्या जमावांत मला विसाजी दिसला नाहीं. हा दुष्ट माझा घात तर करणार नाहीं ना? ही भयंकर शंका माझ्या मनांत चटकन् येऊन गेली. मीं राण्याकडे सभय नजरेनं पाहिलं. त्यानं निश्चयी स्वरांत म्हटलं–" लाग चालूंक बामना!"

'इतकं बोलून राणा तिथून दिसेनासा झाला. वाटाड्या पुढं झाला. मी त्यांच्या मागोमाग चालूं लागलों. माझीं पावलं जड पडूं लागलीं मी आसपास पाहूं लागलों.

'पंधरा मिनिटांची वाट चालून झाल्यानंतर आम्हांला एक वळण लागलं. तिथं झाडी दाट झाली होती आणि वाटहि फार अडचणीची होती. मी वळणावर पोंचलों असेन-नसेन झाडींत 'काड काड' असा बंदुकीचा चाप ओढल्याचा आवाज माझ्या कानांवर आला. मी तिथंच थांबलों आणि चटकन् वळून पाहिलं. माझ्यावर बंदूक रोखून धरलेली विसाजीची भयानक मूर्ति मला दिसली, अन् 'राणे! राणे!' असा निर्वाणीचा उद्गार माझ्या तोंडून निघाला.

'एक क्षण गेला असेल नसेल, झाडींत बंदुकीचा बार झाला आणि विसाजी बंदुकीसकट जमिनीवर आदळला.

'वेगवेगळ्या भावनांनीं मी मूढ होऊन गेलों. स्वप्नसृष्टींत एखादा अद्भुत चमत्कार पाहिल्यासारखं मला वाटलं.

'मी निश्चल होतों. माझा वाटाड्या माझ्याप्रमाणंच हतबुद्ध झाला होता.

इतक्यांत, झाडींतून कांहीं अंतरावर मला रामचंद्र राण्याची उदात्त, उंच मूर्ति दिसली. मीं धावत जाऊन त्याचे पाय धरले. त्यानं मला उठवून म्हटलं—

"आतां हैंसर खंक नाका, चलूंक लाग. देवता तुझ्या पाठीशीं आसा."

'मीं सरळ घरची वाट धरली शेवटपर्यंत रामचंद्र राणा मला सांगात करीत आहे असं मला वाटत होतं.'

---

# जरीचें पातळ

दोन वर्षांनंतर माझ्या मित्राला भेटण्यासाठीं मी ताळगांवला आलों होतों. मी त्याच्या बिऱ्हाडीं पोंचलों तेव्हां सूर्य अजून मावळला नव्हता. पिवळसर उन्हांत नारळीचीं चुडतें चकमत होतीं. माडाची सूर काढणाऱ्या भंडाऱ्यांचीं गीतं नुकतींच कानांवर पडूं लागलीं होतीं.

मी घरांत शिरलों. नागोजीरावानं दिवाणखान्यांत मोठ्या प्रेमानं माझं स्वागत केलं. मी पोषाक उतरून आरामखुर्चीवर बसलों. जवळच्याच खुर्चीवर नागोजीराव बसला. सुरुवातीला उभयतांच्या संसारांतील लहानमोठ्या घडामोडींसंबंधीं बोलणं झालं. दिवाणखान्यांत केलेल्या मांडणीमुळं माझं कुतूहल जागृत झालं. भिंतीला युद्धोपयोगी असं जुनं सामान काळजीनं टांगलेलं होतं— चार-पांच वेगवेगळ्या घाटांच्या लहानमोठ्या तरवारी, पांच-सहा जुन्या बंदुका, भाले, दोन-तीन खंजीर, दारू घालण्याचीं डबडीं, गोळ्या ठेवण्याच्या पिशव्या,

इत्यादि वस्तु मोठ्या धार्मिकतेनं– भक्तिभावानं भिंतीवर मांडण्यांत आल्या होत्या आणि त्यांची निगा ठेवण्यांत आली होती. दुसऱ्या भिंतीच्या मध्यभागीं एक मोठा फोटो टांगण्यांत आला होता. खोलीं-तील वस्तु व वातावरण पाहून मला असं वाटलं, कीं पन्नास-साठ वर्षांपूर्वीच्या एका सेनापतीच्या वाड्यांतच मी आहे! जुन्या वाता-वरणाचा आभास किंवा स्मृति कायम ठेवण्यासाठीं करण्यांत आलेला हा आटोकाट प्रयत्न पाहून, मला नागोजीच्या विक्षिप्त स्वभावाचं कौतुक वाटलं! काल मिळवलेल्या मोठेपणाचीं चिन्हं आम्ही लोक आज खुशाल फेकून देतों; अन् हा माणूस, जुन्या ऐश्वर्याचीं हीं मरणोन्मुख प्रतीकं केवढ्या मायेनं, केवढ्या अभिमानानं जतन करून ठेवतों!

माझ्या मनांत चाललेले विचार नागोजीला कळायला उशीर लागला नाहीं. दिवाणखान्यांतील प्रदर्शनाचं मीं चालवलेलं निरीक्षण पाहून त्यालाहि समाधान वाटलंसं दिसलं. तो म्हणाला,

“ माझं हें वेड तुला हास्यास्पद वाटेल, नाहीं का? लौकिक मोठे-पणाच्या वातावरणांत वाढलेलीं तुम्ही माणसं. आजच्या दिवसांत कवडीमोलाच्या ठरलेल्या या वस्तु मी श्रद्धेनं, प्रेमानं इथं मांडून ठेवतों, हा विषय थट्टेचा आहे याची मला जाणीव आहे. परंतु व्यवहारी जगा-पासून जरा अलिप्त राहून तूं भावनेच्या, श्रद्धेच्या जगांत शिरलास म्हणजे तुला कळून येईल, कीं भावनेचं आवरण दूर केलं तर किती तरी गोष्टी आपल्याला हास्यास्पद, निरर्थक वाटूं लागतील व आपल्याला आयुष्य हें नीरस, स्वत्वशून्य, स्वाभिमानाला वाव न ठेवणारं असं वाटूं लागेल. देशाचं निशाण म्हणजे ज्याच्यावर भावनेचीं, प्रेमाचीं, श्रद्धेचीं पुटं चढवलीं आहेत असा अत्यल्प किमतीचा एखादा कपडाच नाहीं का?

कवडीमोल किमतीच्या त्या फडक्यासाठीं खरे देशभक्त जीव खर्ची घालतात तें का वेडे म्हणून? शेंकडों सेनापतींना स्वातंत्र्याचा दिव्य संदेश जो आपल्या स्फूर्तिदायक वाणीनं सांगणं शक्य नसतं तो संदेश झेंड्याच्या नुसत्या दर्शनानं लोकांच्या गात्रांतून, रक्तांतून, प्राणांतून सळसळ नाचूं लागतो. लोकांना त्या चुरगळलेल्या वस्त्रांत आपल्या पूर्वजांच्या संस्कृतीचा, पराक्रमाचा, धर्माचा जिवंत इतिहास दिसतो, तिथं स्वदेशासाठीं लढत असलेले वीर त्याला दिसतात, स्वातंत्र्यासाठीं समरभूमीवर रक्त ओतणारे हुतात्मे दिव्य तेजानं त्याच्या नजरेपुढं नाचूं लागतात. देशभक्ताला आपल्या निशाणांत राष्ट्राचा देह तळमळत असलेला दिसतो म्हणूनच त्या निशाणाला महत्त्व असतं नाहीं का?

"मुकुंदराव, या अडगळीवजा वस्तूंत मला माझ्या वडिलांचा, माझ्या पूर्वजांचा मोठेपणा दिसत आहे. त्यांचीं साहसं, त्यांचं औदार्य, त्याचं वैभव मला त्यांत दिसत आहे; अन् म्हणूनच आजच्या आमच्या ऱ्हासांत, अवनतींत देखील मला जुन्या वैभवाच्या काळांत जगल्याचा, तेथील मोठेपणा अनुभवल्याचा आनंद प्राप्त होतो. लौकिक मोठेपणाला कालचक्राच्या फेऱ्यानं आम्ही आज मुकलों आहोंत; परंतु पूर्वजांनीं जो वृत्तीचा मोठेपणा कमावला होता तो मरूं देऊं नये म्हणूनच माझा हा प्रयत्न चालू आहे. आम्हांला जरी गरिबी प्राप्त झाली असली, पूर्वजांनी जोडलेली संपत्ति अन् कीर्ति गेली असली, तरी त्यांच्या मोठेपणाला कारण झालेली वृत्ति जागृत ठेवणं हें माझं कर्तव्य नाहीं काय? ही वृत्ति जागृत राहिली, तर मला शक्य नसलं तरी माझ्या मुलां-बाळांना परिस्थितीवर विजय मिळवून आपल्या परंपरेचा, कुटुंबाचा मोठेपणा प्रस्थापित करतां येईल."

इतक्यांत इंदिराबाई दिवा घेऊन बाहेर आली. मोडकळीला आलेल्या

वैभवाची प्रतिमाच वाटली ती मला ! तिनं फोटोखालीं एका स्टँडवर असलेली समई पेटवली. मोगऱ्याची पांढरीशुभ्र माळ फोटोला घातली. उदबत्ती पेटवली, भक्तिभावानं नमस्कार केला. नागोजीरावहि उठून उभा राहिला व त्यानंहि पत्नीचंच अनुकरण केलं. फोटोंतील पुरुष वीरासन घालून बसला होता. देहाची काठी रुंद व भक्कम होती. चेहरा रुबाबदार व तेजःपुंज होता. माथ्याला मंदिल होता. अंगांत भरजरी कोट होता व पायांत इजार घातली होती. उजव्या कानांत मोठी भिकबाळी होती. दृष्टीची झेप पल्लेदार होती, नाक बरंच उंच होतं. चेहऱ्याच्या मानानं हनुवटी जरा लांब होती. ती प्रतिमा, भोवतालचं वीरोचित सामान, समईचा मंद प्रकाश, माझ्या मित्राच्या आतांच्या भाषणानं माझ्या मनावर झालेला परिणाम, या सगळ्या गोष्टींमुळं मींहि न कळत हात जोडले व नमस्कार केला.

इंदिरा निघून गेली.

नागोजी म्हणाला, “ वडील वारल्यास आज वर्ष झालं. आज त्यांचं वर्षश्राद्ध. मरणापूर्वी एकच महिना त्यांनीं या ठिकाणीं मला एक संदेश सांगितला. तुम्ही लेखक आहांत. हा संदेश तुम्हीं लोकांना सांगितला तर माझ्या वडिलांच्या आत्म्याला तेवढंच समाधान वाटेल.”

मला बाबासाहेबांची आठवण झाली. त्यांचं घर हें माझं आजोळ. लहानपणापासून मीं त्यांना पाहिलं होतं. कुटुंबाच्या त्या ऱ्हासकालांत देखील त्यांचा दरारा केवढा मोठा होता ! त्यांच्या कांहीं आख्यायिका मला ऐकून माहीत होत्या व त्यांचे गुण माझ्या परिचयाचे होते. असले पुरुष हल्लीं दिसत नाहींत हेंच खरं. सूर्याला डाग असतात, पण त्याच्या तेजाची सर इतर ताऱ्यांना कशी येईल ? बाबासाहेबांसंबंधीं असंच म्हणतां येण्यासारखं आहे. पडत्या काळांतहि शेवटपर्यंत त्यांची

मूळ वृत्ति कायम होती. मेरपर्यंत ती काठी कोणाहि पुढं नमली नाहीं, वाकली नाहीं. त्यांच्या डोळ्यांतील धैर्याची चमक केव्हांच शिथिल झाली नाहीं.

एकदां तालुक्याच्या मामलेदारांनीं त्यांना कांहीं कामाकरितां बोलावणं पाठविलं. मामलेदार मोठा जुल्मी, घमेंडखोर होता. चांगल्या घरंदाज हिंदु गृहस्थांना कचेरींत आणून त्यांचा पाणउतारा करण्यांत किंवा प्रसंगीं त्यांना चोपहि देऊन त्यांचा छळ मांडण्यांत त्यास मोठी गंमत वाटत होती. पारतंत्र्यांत शेंकडों वर्षं खितपत पडलेले आमचे लोक—त्यांना स्वाभिमानाची काय किंमत ! जनतेनं मुकाट्यानं सरकारी अधिकाऱ्यांचे अत्याचार सहन करावे ! बाबासाहेबांना या अधिकाऱ्याची काय पर्वा ! आपल्या सवडीनुसार ते त्याला जाऊन भेटले; अन् तेंहि आपल्या रुबाबानं ! जणूं काय आपण एखाद्या हाताखालील माणसालाच भेटत अहों ! बाबासाहेबांची ती राहण्याची ऐट, तो पोषाक, बोलण्याची निर्भय तऱ्हा, इत्यादि पाहून अधिकारी गरम झाला व त्यांचा पाणउतारा करण्याच्या हेतूनं त्यानं कांहीं दुरुत्तरं केलीं. त्याबरोबर, काखेंत धरलेला आपला प्रचंड दंडा उगारून ते त्याला मारायला धावले. नोकरलोक व इतर अधिकारी मधें पडले, अन् त्यांना त्यांनीं आवरून धरलं. मामलेदारांना एका खोलींत नेऊन कोंबलं आणि बाबासाहेबांची समजूत घालून त्यांना तेथून बाहेर काढलं. त्यानंतर मात्र त्यांच्या वाटेला कोणीहि गेलं नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांना पक्कं ठाऊक झालं, कीं आपण त्यांचा स्वाभिमान दुखविला तर आपला जीव घेतल्याशिवाय ते स्वस्थ राहणार नाहींत.

दुसरा एक प्रसंग मीं स्वतः डोळ्यांनीं पाहिलेला आहे. घरच्या एका फणसाच्या झाडाचे पिकलेले फणस काढण्यासाठीं एका नोकराला

झाडावर चढविण्यांत आलं होतं. एका लहानशा डहाळीवर जाऊन त्यानं फणसाला हात घातला, आणि इतक्यांत ' कर्रर्र ' असा आवाज होऊन डहाळी मोडून वाकूं लागली. त्याबरोबर नोकरानं किंकाळी फोडली. एका क्षणाच्या आंत तो त्या डहाळीसहित खालीं येणार हें निश्चित होतं. उंची पण थोडथोडकी नव्हती. चांगल्या दुमजली इमारतीएवढी उंची ! खालीं पडला तर जिवंत राहण्याची आशाच नको. अशा वेळीं बाबासाहेबांनीं एकच आरोळी ठोकली—" सूर्या ! भिऊं नकोस; मी खालीं आहे ! " क्षणार्धांत तो नोकर खालीं आला. आणि बाबासाहेबांनीं त्या म्हातारपणांत आपल्या दोनहि हातांवर त्याला अलगद झेलून घेतलं ! चार-साडेचार मण वजनाचा तो देह, केवढ्या जोरानं, केवढ्या उंचीवरून त्यांच्यावर आदळला हें मनांत आणलं म्हणजे त्यांच्या धीराची, त्यांच्या शक्तीची कल्पना येते.

अशा एक-दोनच का, किती तरी शौर्याच्या, औदार्याच्या गोष्टी मला माहीत होत्या. त्यामुळं त्यांच्या मुलांच्याच तोंडून एक रहस्यमय हकीगत आपल्याला आतां ऐकायला मिळणार म्हणून मला किती तरी आनंद झाला.

नागोजीराव हकीगत सांगूं लागले--

'त्या गोष्टीला एक वर्ष अन् एक महिना झाला. त्या दिवशीं वडील घरांत नव्हते. बाहेरगांवीं ते कसल्याशा कामाला गेले होते. सकाळची वेळ, मी घरांत कांहीं तरी लिहीत बसलों होतों. इतक्यांत इंदिरा हातांत एक पातळ घेऊन हसतच आंत आली. पातळाची अलौकिक कांति तिच्या आनंदी चेहऱ्यावर खुलली होती, कीं तिच्या उल्हासाचं प्रतिबिंब पातळांत पडल्यामुळं तें अतीव सौंदर्यानं चमकत होतं तें मला सांगतां येत नाहीं. परंतु इंदिरा अतिशय आनंदी व खुल्या वृत्तीनंच

खोलींत आली. तिनं पातळाची ती इवलीशी घडी माझ्यापुढं करीत म्हटलं, 'हें पाहिलंत का?'

मी त्या पातळाकडे पाहून चमकलोंच. जरीची बारीक किनार, काळंभोर रसरशीत अंग आणि त्याच्यावर असंख्य आडव्या चकचकीत सळया आणि दृष्टीलाहि प्रतीत होणारा त्याचा तलमपणा, हीं पाहून एक अलौकिक वस्तु पाहत असल्याचा भास झाला. मी हळुवारपणें तें हातांत घेतलं. त्याच्या स्पर्शानं मला वाटलं मी हळुवार तर होत नाहीं ना! इंदिरेची अधीरता तर डोळ्यांत नाचत होती जणूं!

मीं म्हटलं, "कुणी आणलं आहे हें पातळ?"

"पातळ आणणारा बाहेर उभा आहे, आपण बाहेरच जाऊन त्याला सगळं विचारायचं."

'आम्ही बाहेर आलों. तिथं एक म्हातारा उभा होता. त्याचा पोषाक शुभ्र होता; पण त्याचा चेहरा वार्धक्यानं व दुःखानं काळवंडल्या-सारखा दिसत होता.

'जास्त चौकशीअंतीं कळून आलं, कीं तें पातळ एका उच्च घराण्यां-तून बाहेर आलं होतं अन् एका व्यक्तीनं तें त्याच्याकडे विकायला दिलं होतं. पातळ जुनं असलं तरी अगदींच थोडं वापरलं गेलं होतं आणि अतिशय अडचणींत पडल्यामुळं त्याचा मालक तें विकायला तयार झाला होता. पातळाची खरी मूळ किंमत चार-पांचशें रुपये तरी होती; परंतु आज तो तें पन्नास रुपयांना देत होता.

'मी थोडा वेळ विचारांत पडलों. पातळ कुणाचं? तें कोणत्या कारणामुळं हस्तें-परहस्तें इथपर्यंत आलं? चार-पांचशें रुपयांचा माल पन्नास रुपयांना देण्यासारखं गूढ त्याच्यामागं काय आहे? इत्यादि प्रश्नांमुळं मी गोंधळांत पडलों. आणि या सगळ्यापेक्षां महत्त्वाची गोष्ट

म्हणजे या पातळाच्या मागं कोणता तरी रहस्यपूर्ण हृदयद्रावक इतिहास आहे, अन् त्यांत एका घराण्यांतील कित्येक जिवांचीं दुःखं, आशा-भंग साठवले आहेत, असंच कुणी तरी माझ्या मनाला सांगत आहे, असा मला भास झाला. इंदिरा पातळ घ्यायला अधीर झाली होती! पातळ हातांत येईपर्यंत जाणारी एकेक घटका तिला किती तरी दीर्घ वाटत होती. ती माझ्या चेहऱ्याकडे पाही. क्षणांत पातळावर नजर स्थिर करी. क्षणांत त्या अनोळखी माणसाचं निरीक्षण करी. अशा या स्थितींत थोडा वेळ गेला. मीं म्हटलं, " तूं आज पातळ इथं ठेवून जा. उद्यां पातळ घ्यायचं कीं नाहीं तें कळवितों."

' दुसऱ्या दिवशीं यायचं कबूल करून तो निघून गेला. आणि पातळाची घडी हातांत नाचवीत इंदिरा एखाद्या पोरीच्या अल्लडपणा-नंच आंत पळून गेली.

' संध्याकाळीं नोकराजवळ मुलांना ठेवून इंदिरा जवळच्याच समुद्र-किनाऱ्यावर गेली होती. मी नुकताच ऑफिसांतून आलों होतों. वडील माझ्यापूर्वीच घरीं आले होते. मी माझ्या वाचनाच्या खोलींत बसून कांहीं वर्तमानपत्रं चाळीत होतों.

' अकस्मात् जवळच्याच खोलींत मला एक किंकाळी ऐकूं आली. माझ्या अंगावर शहारे आले. भीति, उद्वेग, तिरस्कार, करुणा असे किती तरी विकारांचे पडसाद त्या आरोळींत उमटले होते. मी धावतच आंत गेलों.

' बाबासाहेब हताश होऊन जमिनीवर बसले होते. त्यांचं शक्ति-सर्वस्व, जीवनसर्वस्व कुणी तरी हिरावून घेतल्याप्रमाणं त्यांची मुद्रा भयाण, निस्तेज, केविलवाणी दिसत होती. त्यांचं तोंड घामानं थब-

थबलं होतं. त्यांचं सर्वांग कांपत होतं. निजलेल्या जागीं फडा केलेला नाग अकस्मात् निघावा म्हणजे आपली जशी गत होते तशीच गत बाबासाहेबांची झाली होती. ज्याच्या नेत्रांतून पाण्याचं टिपूस कधीं निघालं नाहीं तो पुरुष तोंड झाकून असहायपणें स्फुंदत होता. आणि खोलींत, जमिनीवर—पलंगावर आपल्या असंख्य सळयांनीं चमकत, तें काळं पातळ अस्ताव्यस्त रीतीनं पसरलं होतं.

' मला पाहतांच बाबासाहेब म्हणाले, " नागू ! हें भूत कुणी घरांत आणलं ? "

' मीं गोंधळून गेलों होतों. काय बोलावं तें सुचत नसल्यामुळं मी भीतीनं गप्पच राहिलों.

" नागू ! नाहीं—हें पाहण्याचा धीर मला नाहीं ! आधीं हें माझ्या नजरेपुढून नाहींसं कर—"

' मीं पातळ गोळा केलं व तें दुसऱ्या खोलींत नेऊन टाकलं आणि परत खोलींत आलों.

" नागू तिथं बैस. ह्या पातळाचा इतिहास म्हणजे माझ्या आयुष्याचा इतिहास आहे. हें पातळ म्हणजे माझ्या नाशाची शेवटची पायरी."

' मी श्वास घेऊन ऐकण्याच्या तयारीनं बसलों.

बाबा शांत झाले. कांहीं वेळानंतर त्यांनीं सावकाश बोलण्यास सुरुवात केली—

" वीस वर्षांपूर्वीचा तो काळ. सरकार-दरबारांत व जनतेंत सर-देसाई घराण्याला अतोनात मान मिळत होता. पूर्वजांनीं आदिल-शाहींत मिळविलेलीं इनामं फिरंगी सरकारनं कायम ठेवलीं होतीं. अंत्रूज महालांत किती तरी गांव आमच्या घराण्याला सुटले होते.

त्याशिवाय सरकारांतून 'हक्क' म्हणून वर्षाकांठीं हजारों रुपयांची रक्कम मिळत होती. पूर्वजांनीं शौर्याच्या जोरावर मिळविलेली सत्ता व संपत्ति घरांत नांदत होती.

"पण नंतर कर्तृत्वाचं क्षेत्र संपुष्टांत आलं अन् असलेलं वैभव कसं उपभोगावं एवढाच प्रश्न आमच्यापुढं उभा राहिला. परंपरेंत वाढलेल्या नैसर्गिक प्रवृत्तींचा कोंडमारा झाला व अंगांतील गुणांचा उपयोग सामाजिक प्रश्नांकडे करण्याचं शिक्षण मिळालं नाहीं त्यामुळं, व्यसनांत रममाण होऊन वेळ काढणं एवढंच कार्य शिल्लक राहिलं. एकंदर समाजाची त्या वेळची प्रवृत्तिच अशी, कीं जुगार, वेश्यागमन इत्यादि व्यसनांना अगदीं शिष्ट स्वरूप आलं होतं. जुगार खेळणं अन् कांहीं कलावंतिणी पदरीं बाळगणं हें मोठेपणाचं, श्रीमंतीचं लक्षण मानलं जात होतं. असल्या गोष्टींत पैशाची उधळपट्टी करणारा मनुष्य जास्त उदार मानला जात होता, व उच्चवर्णीयांत त्याला वेगळीच लोकप्रियता लाभे. सामाजिक व कौटुंबिक वैगुण्य या दृष्टीनं या व्यसनांकडे कोणीहि पाहत नसे. आमच्यासारखा व्यसनी पुरुष, मोठ्या आग्रहाखातर, एखाद्या श्रीमंताकडे लग्नसमारंभाला गेला म्हणजे, त्याची जी बडदास्त ठेवण्यांत येई, ती पाहिली म्हणजे आमच्या आचरणाकडे लोक कोणत्या दृष्टीनं पाहतात तें कळून येई. आज समाज किती तरी बदललेला आहे. आमच्यासारखा गृहस्थ एखाद्या लग्नप्रसंगीं हजर राहिला तर तो हास्याचा विषय होतो. कष्टार्जित मोठेपणाला, अन् खऱ्या गुणांना आज महत्त्व आलेलं आहे. ही स्थिति पूर्वी नव्हती. त्यामुळं आम्ही ऐदी, निष्क्रिय, विलासी बनलों होतों. वाईट गोष्ट एवढीच होती, कीं आपण कांहीं अनैसर्गिक व अनैतिक करीत आहोंत, याची आम्हांला मुळींच जाणीव नव्हती. अतिशय विकृत, निंद्य जीवन हेंच आम्हांला

स्वाभाविक जीवन वाटत होतं. दुर्गुणांना आमच्या दृष्टीनं अभिजात गुणांचं स्वरूप आलं होतं. आमचीं व्यसनं हीं आमचं औदार्य दाखविणारीं व आम्हांला लोकप्रियता मिळवून देणारीं साधनं बनलीं होतीं !

" अशा या परिस्थितींत मी लहानाचा मोठा झालों. घोड्यावर बसणं, नेम मारणं, पारध करणं वगैरे गोष्टींत प्रावीण्य मिळविलं. रयतेची अनन्य निष्ठा, उच्चवर्गीयांचा आदर, व्यसनासक्त सहकाऱ्यांचं प्रेम अशा उत्साहाच्या वातावरणांत आयुष्याचे दिवस झराझर जाऊं लागले. बुद्धीला—विवेकाला बधिरता आली. भावनांना धुंदी चढली. स्वतःच्या मोठेपणाच्या जाणिवेंतच मन रममाण होऊं लागलं.

" मनाच्या या विकृत अवस्थेंत बायकोचं सुख कुणाच्या लक्षांत होतं ? बायकांच्या कुलीनत्वाची कसोटी वेगळी होती. आम्ही पुरुष अनाचार राजरोसपणें करूनहि कुलीन गणले जात होतों. स्त्रिया मात्र तितक्याच अधिक बंधनांत, अधिक पारतंत्र्यांत पिचत पडल्या होत्या. बाहेर सहसा न दिसणं, इतरांशीं संभाषण न करणं किंवा इतरांकडे न पाहणं, आपल्या पतीशीं वागतांना देखील मर्यादेचा अतिरेक न करणं इत्यादि गोष्टींवर त्यांचं कुलीनत्व आम्हीं अवलंबून ठेवलं होतं. त्यामुळं त्यांच्या दुःखांना केव्हांच वाचा फुटत नव्हती. अन् फुटलीच तर आम्हांला त्याची पर्वा नव्हती ! स्त्रियांशीं मनमोकळेपणानं, आनंदानं, प्रेमानं बोलण्याची आम्हांला गरजच आधीं कुठं भासत होती ? परस्त्रियांच्या रंगमहालांत आमचे विलास चालत. आमचा हास्यविनोद, आमच्या शृंगारचेष्टा, आमच्या मनाच्या सगळ्या कामविषयक आवडी आम्ही तिथंच भागवीत असूं. मग, बायकांच्या मनाला विचारतो कोण ? औरस संतति लाभावी येवढा बायकोचा उपयोग. हीच दृष्टि सगळीकडे प्रचलित होती. या वागणुकीमुळं बायकांचे केवढे हाल

झाले असतील याची कल्पना मला तुझ्या आईच्या मरणापासून येत आहे.

" माझं लग्न झालं; पण विवाहाचं पावित्र्य राखण्याचं बंधन माझ्यावर नाहीं अशीच माझी समजूत होती. बायकोचं सौंदर्य अन् गुण लक्षांत घेऊन तिचं कौतुक केलेलं मला आठवत नाहीं. मन कधींकाळीं आनंदांत असलं तर तिच्याशीं मनमोकळेपणानं बोलण्याचं औदार्य दाखवायचं. तुझी आई अतिशय सुस्वरूप होती, पण हें सौंदर्य मला सुखी ठेवण्यासाठीं तळमळत असतांना, मी इतर बाजारबसव्यांचं हिणकस नकली सौंदर्य धुंडाळीत फिरत होतों. मीं रात्रीचं जेवण झाल्यावर घोड्यावर बसून नागेशीस यावं व तिथंच बहुतेक रात्र घालवल्यानंतर पहाटेला घरीं यावं, हा प्रकार तिला असह्य होई. पण, आपलं दुःख उघड करण्याइतकं तिला धैर्य नव्हतं. शिवाय कुलीनपणाच्या मर्यादा जिथं तिथं आड येत. नवऱ्याशीं भांडणं किंवा नुसतं रुसणं देखील कुलीन स्त्रीला शोभणार नाहीं असंच प्रत्येक स्त्रीचं त्या वेळीं मत होतं. त्यामुळं वर्षानुवर्षं स्त्रियांचे हालहाल होत असले तरी ते बोलून न दाखवण्याची किंवा चेहऱ्यावर अगर वर्तनांतून त्यांची जाणीव दुसऱ्याला न कळूं देण्याची खबरदारी घेण्यांत त्या अतिशय तरबेज झाल्या होत्या. पार्वतीला माझं वर्तन पसंत नव्हतं, व ती दिवसेंदिवस मनांत झुरत होती, हें मला तिच्या उदास चेहऱ्यावरून कळत होतं. परंतु भावनांची नाजुकताच त्या वेळीं करपून गेली होती. मग बायकोच्या सुखदुःखांना महत्त्व देऊन तिचं मन आनंदित, प्रसन्न ठेवणं मला कसं शक्य होणार?

" त्या वेळीं तुझा जन्म झाला होता. बारशाच्या दिवशीं संध्याकाळीं तुला एका पांढऱ्या फडक्यांत गुंडाळून पार्वती माझ्या खोलींत आली

होती. ती त्या दिवशीं किती सुंदर दिसत होती! तिचं त्या दिवशींचं तें दर्शन माझ्या हृदयावर कोरलं गेलं आहे. ती काळं उंची लुगडं नेसली होती अन् त्याच दिवशीं आंघोळ केल्यामुळं तिनं आपले केस मोकळे सोडले होते. आपल्या सोज्ज्वळ डोळ्यांत तिनं काजळ घातलं होतं. कपाळाला कुंकवाची बारीक व लांब रेघ लावली होती. शरीराप्रमाणं मनालाहि अभ्यंग स्नान घालूनच जणूं काय ती आली होती. तिच्या देहांतून, तिच्या मनांतून पावित्र्य, शुचिता जणूं काय स्रवत होती. स्त्रीच्या आयुष्यांत प्रेमानंतर वात्सल्य ही प्रभावी भावना आहे. तिला त्या दिवसांत बहर आला होता. तिच्या गोरेपणाला पिवळसर माधुर्य प्राप्त झालं होतं. एक प्रकारचा प्रशान्त गोडवा, तिच्या मुखावर विलसत होता. आयुष्यांतील दुःखं वात्सल्यभावनेंत विरून गेलीं होतीं. ती भावना आनंदाची नव्हती—पण पूर्णत्वाची, तृप्तीची होती. त्या नजरेंत कारुण्य होतं, पण तें किती विशुद्ध उदात्त स्वरूपांत होतं! परमत्वाचा लाभ झालेल्या महाभागाच्या चेहऱ्याची उपमा तिच्या चेहऱ्याला शोभत होती.

" तुला हातांत घेऊन ती किती तरी वेळ तुझ्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहत होती. मी आलें हें तिला कळलंसुद्धां नाहीं. तुला पाहतां पाहतां तिच्या नेत्रांतून आंसवं गळूं लागलीं. मी पुढं झालें. मुलगा झाला म्हणून मला किती आनंद झाला होता! ती रडत असलेली पाहून मला वाईट वाटलं. मीं तिला विचारलं, 'पार्वती! येवढ्या आनंदाच्या प्रसंगीं तुझ्या डोळ्यांतून पाणी कसं निघतं ?'

" तिनं सुस्कारा टाकला व म्हटलं, 'स्त्रियांना छळणारा आणखी एक पुरुष आपल्या घराण्यांत जन्माला आला, म्हणून मी रडत आहे."

" मीं प्रत्युत्तर केलं नाहीं. या उत्तरांत माझ्या आयुष्यावर विदारक टीका होती. तुला कुरवाळून मी निघून गेलें.

“ एका नवीनच पोरीनं मला पागल केलं होतं. दिवसांतील बहुतेक वेळ मी तिथंच घालवीत असे. मला एकदां अशी विचित्र भयंकर लहर आली, कीं चांगल्या माणसाच्या अंगावर ती ऐकतांच शहारे यावेत. तुझ्या आईच्या संग्रहीं एक अतिशय उंची जरीचं पातळ होतं. हेंच तें जरीचं पातळ! लग्नाच्या वेळीं तिला तिच्या आईनं तें भेट म्हणून दिलं होतं. त्या पातळावर तिचा जीव कीं प्राण होता. तिनं तें एकदोनदां वापरलं असेल नसेल! तें पातळ माझ्या प्रेमपात्रानं नेसून मीं पाहावं अशी मला इच्छा झाली. पण तें हस्तगत कसं करणार हा प्रश्न होता. त्यासाठीं मी कुटिल बनलों, मी खोटं बोललों. तुला वाटेल, लोक ज्याची एवढी स्तुति करीत, तो हा पुरुष इतका नीच आहे का? हो मी नीच झालों. वेश्यांच्या पायीं मीं हरएक पाप केलीं. सगळं कांहीं तुझ्यापुढं उघड केल्याशिवाय मरणापूर्वी मला शांतता लाभणार नाहीं. म्हणूनच आतां उघड मनानं मी सांगतों तें ऐक.

“ माझ्या एका जीवलग मित्राच्या घरीं एक मोठा समारंभ असून त्याच्या बायकोसाठीं त्यानं पातळाची मागणी केली आहे असं मीं पार्वतीला सांगितलं. तिनं सुरुवातीला आढेवेढे घेतले. आपल्या अंगावरचं वस्त्र इतरांना नेसूं देणं ही गोष्ट तिच्या मनाला फारच लागली; पण माझा आग्रह पाहून तिनं पातळ माझ्या हवालीं केलं. मी मोठ्या आनंदानं पातळ नेऊन माझ्या वेश्येला दिलं व तिनं तें नेसलेलं पाहून मी कृतार्थ झालों! इतरांच्या सुखासाठीं धारातीर्थी देह ठेवणाऱ्या वीरांचा मी वंशज, परंतु वासनांनीं माझ्या गुणांची माती करून टाकली होती! मी नराधम बनलों होतों!

“ वर्षातून एकदां चैत्रीपौर्णिमेला आमच्या घरची बायकामंडळी नागेशला जात असत. त्याप्रमाणं याहि वर्षी आली होती. प्राकारांत

मोठा मंडप घातला होता व तिथं कीर्तन चाललं होतं. हजारों लोक बसले होते. देवाच्या आसनाशेजारीं उजव्या बाजूला आमच्या घरांतील बायका बसल्या होत्या. सगळे एकाग्रतेनं कीर्तन ऐकत होते.

"इतक्यांत दुरून मंडपांत बसायला येणाऱ्या माझ्या कलावंतिणीकडे पार्वतीची नजर गेली आणि तिच्या अंगावर तें काळं पातळ, असंख्य जरीच्या काड्यांनीं चमकत असल्याचं पाहून, पार्वतीनं बारीक किंकाळी मारली व ती तिथंच बेशुद्ध झाली. मंडपांत एकच गडबड उडाली. पार्वतीला सावध करण्यांत आल्यानंतर लवकरच माचिलांतून आम्ही घरीं आलों. तिनं अंथरूण धरलं. ती माझ्याशीं एकहि शब्द बोलली नाहीं; आणि बरोबर एकाच महिन्यानं तिनं देह ठेवला !

"बाळ, माझ्या संसाराची कहाणी ही अशी आहे. आम्हीं स्त्रियांना परोपरीनं रडवलं, नाना तऱ्हांनीं त्यांचा छळ केला म्हणूनच आमचं सारं वैभव अन् सत्ता नाहींशीं झालीं. इतरांना व विशेषतः स्त्रियांना रडवून कुणीहि सुखी होऊं शकत नाहीं. म्हणून, केवढीहि आपत्ति आली तरी घरच्या लक्ष्मीला रडवूं नकोस. तिचं हास्य हीच तुझ्या सुखाची चिरंतन ज्योत आहे असं समज."

—— ——

# गतकालाचे पडसाद

कारखान्याचें तें गतिमान् दृश्य पाहून श्यामचें मन हर्षोत्फुल्ल झालें. ज्या कार्यासाठीं त्यानें हालअपेष्टा सोसल्या होत्या, रात्रीच्या रात्री विचारांत जागत काढल्या होत्या, त्या कार्याला त्या दिवशीं प्रारंभ झाला होता. नुकत्याच जन्म पावलेल्या अर्भकावर नजर पडतांच, त्याचें आक्रंदन ऐकतांच आणि त्याचें चलनवलन पाहतांच, मुलासाठीं आसावलेल्या स्त्रीला आपल्या सगळ्या शिणाचा विसर पडावा आणि आनंदाच्या त्या परमोच्च स्वरूपांत तिचे सगळे शारीरिक व मानसिक क्लेश विसरून जावे, तसें श्यामचें झालें. ते पांच-सहाशें खपणारे मजूर पाहून त्याला धन्यता वाटली. आणि ते लोक कसले? ज्यांना जिणें जड झालें आहे असे! उकिरड्यावर टाकून दिलेल्या चिरगुटांसारखीच त्यांची स्थिति! आजची जोड आज मोडायची! रोगराई, दुष्काळ, वार्धक्य यांच्या बाबतींत परमेश्वरावर विसंबून दिवस कंठायचे! पावसाळ्यांत पांघरा-

यला अंगभर कांबळें नाहीं, उन्हाळयांत पोटभर अन्न नाहीं, घरें तर चंद्रमौलि व हें दैन्य कांहीं दिवस नव्हे, महिने नव्हे, सतत वर्षानुवर्षे, आयुष्यभर काढायचें, अशी ज्यांची स्थिति, ते शेंकडों खेडूत सुखी होत असलेले पाहून श्यामला वाटलें, आज आपल्या आयुष्याचें सुखस्वप्न खरें ठरलें !

तो आज कारखानाभर किती तरी फिरला. लोखंडी निर्जीव यंत्रें व तीं शेंकडों सजीव यंत्रें यांचें त्यानें प्रेमानें निरीक्षण केलें. कोठारांत जाऊन त्यानें काजूबियांचे ढीग पाहिले. काजू भाजण्याच्या भट्टींतून झरझर काजू भाजून निघत आणि एका नळकांड्यांतून काळाभोर डीक निघून भल्या मोठ्या पिपांत पडे. भाजून निघालेल्या काजूबिया एका मोठ्या आवारांत जात, तेथें शेंकडों बायकामुलें रांगेनें बसून लांकडी हातोड्यांनीं त्या बिया फोडीत. तेथून तयार झालेले गर दुसऱ्या जागीं नेण्यांत आल्यावर तेथें अनेक 'कामेरी' त्यांचीं फोलकटें काढीत आणि नंतर त्यांतील अखंड गर पेट्यांत भरून ठेवीत. श्यामनें त्या सगळया क्रिया किती तन्मयतेनें पाहिल्या !

तो आपल्या कामाच्या खोलींत आला. तेथून बाहेरचा सगळा बहुविध देखावा दिसत होता. जिकडेतिकडे जीवन आणि सौंदर्य यांचा उद्बोधक संगम त्याचें चित्त वेधीत होता. चार-पांच दिवसांच्या अखंड वृष्टीनंतर सृष्टि हसरी टवटवीत दिसत होती. निळींत काढलेल्या शुभ्र तलम वस्त्राप्रमाणें, आकाश स्वच्छ, निळसर दिसत होतें. आसपासच्या गोंडस, लुसलुशीत शेतांचा उमलता कोंवळेपणा दृष्टीला गोंजारीत होता. त्यांच्यामधून सूर्यकिरणांत चमचमत वाहणारे पाण्याचे पाट त्यांची पाठराखणी करीत होते. समृद्धि व जीवनरस यांनीं ओसंडून निघालेल्या सुदृढ व तरुण मातेप्रमाणें नदी वळणावळणानें

वाहत चालली होती. आणि भोंवतालच्या लहानमोठ्या टेकड्यांवरील उन्मत्त वृक्षराजी हिरवी-काळी दिसत होती.

हें चेतोहर दृश्य पाहून, जीवनाचें यथायोग्य पोषण झालें, तर तें किती वैभवशाली बनतें, असा विचार श्यामच्या मनांत येऊन गेला.

नोकरानें टपाल आणून मेजावर ठेवलें. त्याच्यावरून त्यानें नजर फिरविली, आणि आईच्या हस्ताक्षराचें पाकीट पाहून त्यानें तें उत्सुकतेनें फोडलें, आणि पुढील मजकुरानें त्याचें लक्ष जास्तच वेधून घेतलें.

"मी सध्यां जरा आजारी आहे. पण, भ्यायचं कांहीं कारण नाहीं; एका महत्त्वाच्या विषयावर तुझ्याशीं पुष्कळच बोलायाचं आहे. तेव्हां तूं शक्य तितक्या लवकर निघून ये !"

हा मजकूर वाचून श्यामची प्रसन्नता मावळली. त्याच्या जुन्या दुःखस्मृतीची चाळवाचाळव झाली. 'आपल्या मृत पित्याची व्यसनासक्तता आणि त्यांच्या हातून घडलेले अनाचार, त्यामुळें आईला भोगावे लागणारे शारीरिक व मानसिक क्लेश, घराण्याची आत्यंतिक विपन्नावस्था आणि व वडिलांच्या पापांचीं आईला दिवसरात्र गांजणारीं भुतें या सर्वांच्या आठवणीनें त्याचें मन व्यथित झालें. आपला जाचक भूतकाळ पुसून टाकण्यासाठीं आपण किती जिवापाड मेहनत घेतली ! घरच्या कारभाराची अव्यवस्था दूर केली, ऊनपावसाची पर्वा न करतां पडित जमिनी लागवडीला आणल्या, सावकारांची कर्जफेड करून घर ऋणमुक्त केलें, शिक्षण घेतलें, प्रवास केला, उद्योगधंद्याचें शास्त्रीय ज्ञान मिळविलें, परंपरागत मोठेपणा गाजवून आलेल्या घराण्याचा उद्धार केला. वडिलांच्या दुष्कृत्यांवर विस्मृतीचा पडदा पडावा, म्हणूनच आपण हें सारें केलें. शेवटीं, कारखान्याचा

हा प्रचंड व्याप उभारला. पण, मनःस्वास्थ्य मात्र आपल्याला लाभलें नाहीं. आईचें तें दुखणें...आपणाला समाधान लाभूं देत नाहीं. ..."

वरील विचारांच्या आंचीनें त्यानें येरझारा घालण्यास सुरुवात केली. जवळच यंत्रांची घरघर व मजुरांची गडबड चालली होती. पण, त्यांच्या मिठींतून त्याचें मन निसटून जाऊं पाहत होतें.

श्याम दुसऱ्या दिवशीं आपल्या घरीं गेला.

आईच्या खोलीत त्यानें प्रवेश केला, तेव्हां ती झोपली होती. तिच्या क्लान्त मुद्रेवर मानसिक जाचांचें प्रतिबिंब पडलें होतें. तिचें उतारवय झालें नसलें तरी निकटवर्ती वार्धक्याच्या विषण्ण छाया तिच्या श्रान्त गात्रांवर व विशेषतः तिच्या धीरोदात्त चेहऱ्यावर पसरल्या होत्या. तिची कुंकुमविहीन विस्तृत कपाळपट्टी आणि लांब व उठावदार भुंवया यांच्यामुळें तिच्या मुद्रेवर औदासीन्य व मोठेपणा हीं एकवटलेलीं दिसत होतीं.

श्याम हलक्या पावलांनीं खोलींत शिरला. कारुण्य आणि आदर यांनीं त्याचें अंतःकरण भरून येऊन तो पलंगावर तिला बिलगून बसला.

ती डाव्या कुशीवर झोपली होती. तिचा मंद, कष्टी श्वासोच्छ्वास त्याला ऐकूं येत होता.

श्यामनें केवढा वेळपर्यंत अनिमिष नेत्रांनीं तिच्याकडे पाहिलें आणि तिच्या त्रस्त गतायुष्यांतील ठळक प्रसंग त्याच्या मनश्चक्षूंपुढून निघून जाऊं लागले.

तिचें आयुष्य दारुण दुःखांशीं झगडण्यांत गेलें होतें. तिचें लग्न एका घरंदाज कुटुंबांत झालें असलें, तरी तिचा नवरा जुगार, दारू व बाहेरख्याली या तिन्ही व्यसनांपायीं कुचकामी ठरला. घरची दौलत

त्यानें वाऱ्यावर टाकली. बायकोच्या सुखाकडे त्यानें कधींहि लक्ष पुरविलें नाहीं. ती बिचारी नेहमींच मनांत झुरत राहिली. नवऱ्याला व्यसनापासून परावृत्त करण्याइतकी बुद्धि आणि सामर्थ्य असून तिला तसें करतां आलें नाहीं. कारण, कुलीनपणाच्या कांटेरी मर्यादांत ती कोंडली गेली होती. अशा अवस्थेंत तिनें पंधरा वर्षें काढलीं. नंतर तिच्या पोटीं श्याम जन्माला आला. तो पांच वर्षांचा होण्यापूर्वींच त्याचे वडील व्यसनातिरेकामुळें वारले. ती विचित्र परिस्थितींत सांपडली. घरच्या कारभारांत किती तरी गोंधळ उपस्थित झाले होते. तिच्या हातांत पैसा नव्हता, पण तशा स्थितींतहि तिनें धीर खचूं दिला नाहीं. पतिसुखाला ती पहिल्यापासूनच मुकली होती. त्यामुळें, आपल्या जुन्यानव्या सगळ्या आशाआकांक्षा तिनें श्यामवर केंद्रित केल्या. नवऱ्याप्रमाणें तो वाईट निपजणार नाहीं ना, ही भीति केव्हां केव्हां तिच्या हृदयाला चाटून जाई. त्या वेळीं उत्कृष्ट गृहशिक्षण देऊन त्याला आपण सदाचारी बनवूं, या विचारानें तिच्या मनाला समाधान लाभे, आणि म्हणूनच नवऱ्याच्या दुर्लौकिकामुळें, घराण्याला आलेली अवकळा दूर व्हावी या हेतूनें तिनें श्यामला त्याच्या वयाच्या पंचविसाव्या वर्षापर्यंत मोठ्या कसोशीनें बौद्धिक व नैतिक शिक्षण दिलें. श्यामनें घरचा कारभार हातांत घेतला. त्यांत सुधारणा केल्यावर तो कारखान्याच्या मागें लागला आणि त्याच्या प्रयत्नांना यश येऊन शेवटीं कारखाना सुरू झाला.

हा सगळा इतिहास त्याला आतां आठवला व आपल्या उत्कर्षाचें सर्व श्रेय आपल्या आईला आहे, ही जाणीव त्याला अधिक उत्कटतेनें झाली. केव्हां केव्हां, त्याला असेंहि वाटे, कीं आईच्या दुबळेपणामुळेंच वडलांचीं व्यसनें अतिरेकाला गेलीं. तिच्या कुलीनपणामुळें व सौजन्या-

मुळें त्यांच्या वर्तनाला आळा बसला नाहीं. ती खंबीर असती, तर तिचें आयुष्य सुखांत गेलें असतें आणि आजाराच्या रूपानें त्यांचें पाप तिला असें भोंवलें नसतें. आपले हे विचार आईकडे बोलून दाखवण्याची त्याला अनिवार इच्छा होई. परंतु तिचीं जुनीं दुःखें पुन्हा जागृत होऊं नयेत म्हणून तो तिच्या गतजीवनाविषयीं मुग्धच राही.

थोड्या वेळानें आईनें हलकेच डोळे उघडले, आणि श्यामवर तिची नजर जातांच तिच्या उदास मुद्रेवर समाधानाचा विरल गोडवा पसरला.

" आलास तूं ? बरा आहेस ना ?"—तिनें प्रेमळ स्वरांत हळूच विचारलें.

" कालच तुझं पत्र मिळालं. केव्हांपासून तुझ्या या आजारानं पुन्हा उचल खाल्ली ? "

" आज पांचवा दिवस. डॉक्टर आजच सकाळीं प्रकृति तपासून गेले आहेत."

" काय म्हणतात ते ? "

" दुसरं काय म्हणणार ! तेंच दुखणं...तींच औषधं ! "

श्यामला तिच्या बोलण्याचा अर्थ कळला. त्याला फार वाईट वाटलें.

" मी डॉक्टरकडे जाऊन येऊं का ? " त्यानें प्रश्न केला.

" नको आतां. अन् हें पहा श्याम, मी माझ्या प्रकृतीसाठीं नाहीं बोलावलं तुला इथं. माझं आतां काय ! मी आतां पिकलं पान आहें. माझं दुखणं हें नेहमींचंच. त्याला महत्त्व तें काय द्यायचं ? तुझा उत्कर्ष व त्यामुळं तुला लाभणारं सुख पाहून माझ्या वेदनांचा मला विसर पडतो."

" आई, असलं कसलं बोलणं तुझं हें ? आपणा दोघांचीं सुखं वेगळीं का आहेत ? अन् सुख कोणत्या गोष्टींत आहे हें तरी तूंच नाहीं

का मला शिकवलंस? तुझं मार्गदर्शन नसतं, तर कुणाला ठाऊक, माझी काय गत झाली असती! आणि मी नाहीं तरी, माझा उत्कर्ष अन् माझं सुख तुझ्या समाधानावरच आधारलेलं आहे."

" बाळ, मला माहीत आहे हें सारं. लहानपणींच कुटुंबाच्या नांव-लौकिकासाठीं तूं सोसलेले कष्ट मी कशी विसरेन? तूं सुदृढ असलास तरी तुझी प्रकृति नादुरुस्त असते. पण तूं तिकडे नेहमींच दुर्लक्ष करीत आला आहेस. खरूज, पडसं, गळवं येणं वगैरे विकार तुला लहानपणीं नेहमीं त्रास देत. डॉक्टर म्हणत, तें सगळं रक्तदोषानं होतं व आतां दिखील तूं सर्वस्वीं कुठं बरा आहेस—"

" खरंच आई, वर्षांतून दोन-तीनदां माझी प्रकृति बिघडते. कामाच्या गर्दीत तिकडे लक्ष द्यायला मला वेळ सापडत नाहीं."

" हल्लीं नवीन कांहीं होत नाहीं ना तुला?" तिनें भीतिग्रस्त होऊन म्हटलें.

" नाहीं कसं? पाठीचा कणा व डोकं यांत वेदना अन् दाह होतो, डोळे दुखूं लागतात, रात्रीच्या रात्री झोपेशिवाय जातात, अन् जिवाची तगमग होते. पण हें थोडेच दिवस. हळूहळू गुण पडत जातो व पूर्ववत् हुषारी वाटते."

" मग डॉक्टरचं औषध कां नाहींस करीत तूं?"

" श्रमाच्या अतिरेकानं हें असं होतं, असं डॉक्टरचं म्हणणं. अन् मलाहि असंच वाटतं. अन् असल्या दुखण्याचं काय मोठंसं? माणूस कामांत गुंतलेलं असलं म्हणजे असले लहानसहान विकार आपोआप नाहींसे होतात. त्यासाठीं वेगळ्या औषधांची नाहीं गरज लागत. तुला नाहीं का असं वाटत?"

" तुझी ही अशी प्रकृति पाहून मला असं वाटूं लागलं आहे, कीं

तुझी आस्थेनं काळजी घेणारं माणूस घरांत आणलं पाहिजे. मी काय असून नसून सारखीच ! ”

“ अन् तुझी सेवाचाकरी करायला माणसाची गरज नाहीं वाटतं ?” श्याम मिष्किलपणानें हसत म्हणाला.

“ तेंहि खरंच, मला दिखील आतां प्रेमाच्या माणसाची सोबत हवी. तूं तिन्ही त्रिकाळ कारखान्याच्या व्यापांत मग्न असणार; शिवाय कारखान्याची तुझी योजना यशस्वी झालीच आहे, तिच्यापायीं तूं आज तीनचार वर्षे खपलास. आतां तुला दुसऱ्या गोष्टीकडे लक्ष पुरवलं पाहिजे, अन् हें पहा श्याम, कांहीं किरकोळ आजार असे असतात, कीं मायेचं माणूस जवळ असलं म्हणजे ते नाहींसे होतात.”

आईच्या गंभीर मुद्रेवर आतां खेळकर विनोदाची झाक दिसूं लागली. श्याम गप्पच राहिला. लग्नाचा विषय त्याला प्रिय नव्हता असें नाहीं. पण त्यानें त्यासंबंधीं गंभीरपणें केव्हांच विचार केला नव्हता. त्यामुळें आईनें संभाषणाला दिलेलें वळण त्याला जितकें मजेदार, तितकेंच अनपेक्षित वाटलें.

“ श्याम, मी या बाबतींत आधींच वचनबद्ध होऊन बसलें आहे.” आई, सावकाश, श्यामच्या मनाचा ठाव घेण्यासाठीं त्याच्या चेहऱ्याचें निरीक्षण करीत म्हणाली.

“ म्हणजे ? तूं वचन दिलं आहेस का कुणाला ? ”

“ हो. अन् तेंहि तुला न विचारतां.”

“ मग सांग पाहूं कुणाला वचन दिलंस तें ? ”

“ सांगितल्याशिवाय नाहीं का कळत तुला ? ”

“ शकुंतलेच्या आईला का ? ”

“ खरंच. अन् वचन देण्याच्या योग्यतेचीं माणसं नाहींत का तीं ? ”

" मी नाहीं कसं म्हणूं ? पण वचन देणं ही गोष्ट फार जबाबदारीची आहे, नाहीं का ?"

" मग शकुंतलेचा विसर पडला वाटतं तुला ?"

" मी तिला कशी विसरेन ? तुझ्या आयुष्याशीं तिची आठवण निगडित झाली आहे."

" खरंच, तिनंच मला जीवदान दिलं, असं मला वाटतं. तिच्या प्रेमळ शुश्रूषेमुळंच मी जगलें ! जवळचं माणूस आपला जीव ओवाळून टाकण्याच्या तयारीनं रोग्याची निगा करीत असलं, म्हणजे त्याला मरणाची भीति नाहीं असं मला त्या आजारांत दिसून आलं. माझ्यासाठीं तिनं काय करायचं ठेवलं आहे ?"

आई थोडा वेळ थांबली. श्यामनें पुढें केलेल्या पेल्यांतून तिनें कॉफीचे दोन घोट घेतले; श्वास घेतला व पुढें ती बोलूं लागली—

" तसं पाहिलं, तर शकुंतला आपली दूरची नातेवाईक. तिची गरीबी पाहून मी कांहीं दिवसांसाठीं तिला आमच्याकडे बोलावून घेतली. अगदीं त्याच दिवसांत मी आजारी पडलें अन् तिनं पोटची मुलगी करणार नाहीं, अशी माझी सेवा केली. तुला आठवत नाहीं का हें सगळं ?"

" न आठवायला काय झालं ? फार वर्षं नाहीं झालीं या गोष्टीला. फार तर पांच-सहा वर्षं. शकुंतलेला त्या वेळीं बारा-तेरा वर्षं असतील. मला सगळ्या गोष्टी आठवतात तिच्या."

" खरंच का ?"

" हो तर! फार प्रेमळ आणि गोड मुलगी आहे ती."

" दिसण्यांत दिखील किती नाजूक अन् सुंदर ! जणूं काय सोनचाफ्याचं फूलच ! नवा पोषाक केला म्हणजे गरीब कोण म्हणेल

तिला. माधुर्य आणि कांति तिच्या गात्रांगात्रांतून ओसंडत असे जणूं. अन् ती हसूं लागली म्हणजे मला वाटे, कीं तिचे ते डोळे, गाल, हनुवटी सगळं कांहीं हसूं लागे.

"तूं म्हणतेस तें कांहीं खोटं नाहीं. मला दिखील तिचं हास्य फार गोड वाटे."

"हें मला माहीत होतं, म्हणूनच तर मीं तिच्या आईला असं वचन दिलं, कीं मी तिला चांगला नवरा शोधून देईन, लग्नखर्च मी करीन..."

"एवढंच ना वचन! मग मला कांहीं भ्यायचं कारण नाहीं. मुलगी चांगली आहे, अन् आपल्यांत नवरेदेखील थोडेथोडके नाहींत. पैशाचा प्रश्न सहज सुटेल."

"पण, माझ्या वचनाचा अर्थ असा कुठं होता! मी तिच्या आईला वचन दिलं तें अशा अर्थानं नव्हे."

"मग?..."

"मी शकुंतलेला माझी सून करून घेईन असं मीं तिला वचन दिलं आहे."

"खरंच का आई!"

"खरंच. अन् मी यांत वाईट तें काय केलं रे? तुला ती आवडत नव्हती का?"

भुवया वर चढवून, जिवणी खालीं सरकवून, श्याम आईकडे, विचारी पण हसऱ्या मुद्रेनें पाहत गप्पच राहिला.

"आतां बोलत कां नाहींस! तुला ती आवडत होती अन् तिला तूं आवडत नव्हतास असं तरी आहे का? त्या वयांत दिखील तुझी ओढ तिला किती तरी लागली होती. तूं दिसलास म्हणजे तिच्या

गालांच्या खळ्या जास्तच खोल होत, हें मीं कितीदां तरी पाहिलं आहे. अन् तुझ्यासंबंधीं गोष्टी निघाल्या, कीं किती कुतूहलानं, किती आतुरतेनं तिनं त्या ऐकत बसाव्यात! माझ्या शेजारीं बसून तुझ्यासाठीं तिनं गोड गोड गाणीं म्हणावींत."

" मला आठवतं हें सारं, आई."

" आणि इथून गेल्यानंतर तिचं पुढचं शिक्षण झालं, असं मला कळलं. तिच्या भावानं तुला नाहीं का लिहिलं कधीं?"

" सुरुवातीला त्यानं मला कांहीं पत्रं पाठवलीं; पण माझ्या कामाच्या गडबडींत मींच तिकडे दुर्लक्ष केलं."

" फार वाईट केलंस तूं. त्या देवमाणसांना त्यामुळं किती दुःख झालं असेल याची तुला कल्पना नाहीं. तुझ्या महत्त्वाकांक्षेच्या निशेंत तूं शकुंतलेला विसरलास; पण ती तुला कधींहि विसरली नाहीं. माझ्या म्हणण्याचा खरेपणा पाहयचा का तुला?"

ती उठून बसली आणि गादीच्याखालीं ठेवलेलें पत्रांचें एक पुडकें काढून तिनें तें श्यामकडे देत म्हटलें,

" हीं शकुंतलेचीं मला आलेलीं पत्रं वाचून पहा. जा तूं आतां इथून. तुला विश्रांतीची गरज आहे."

श्यामनें अधीर मनानें तीं पत्रें हातीं घेतलीं आणि आईचा निरोप घेऊन तो खोलींतून बाहेर पडला.

श्यामला आतां नव्याच भावनांचा अनुभव आला. त्यानें शकुंतलेला पाहिली होती आणि ती त्याला आवडलीहि होती. तिचा मधुर स्वभाव त्याला ज्ञात होता. परंतु विवाहाच्या दृष्टीनं त्यानं तिच्यासंबंधीं केव्हांच विचार केला नव्हता. कारण ज्या वेळीं ती त्याच्याकडे होती, त्या वेळीं तिनं तारुण्यांत प्रवेश केला नव्हता. शिवाय घराण्याचा

उद्धार, कारखान्याची योजना, इत्यादि महत्त्वाच्या गोष्टींकडे त्याचें मन लागलें होतें. त्यामुळें विवाहासारखा प्रश्न त्याला सुचणें शक्य नव्हतें, आणि म्हणून आईनें त्याच्याकडे काढलेला विषय त्याला प्रिय वाटला तरी, त्यामुळें तो बराच विचारांत पडला. आपलें व्यक्तिविषयक सुख त्यानें नेहमींच दुर्लक्षिलें होतें. आपल्या घराण्याचें, आपल्याभोंवतीं पसरलेल्या लोकसमुदायाचें हित नजरेपुढें ठेवून तो काम करीत होता. त्यामुळें, व्यक्तिगत सुखदुःखांचा विचार करायला त्याला वेळ नव्हता आणि तें त्याच्या स्वभावाशीं जुळतहि नव्हतें. या कारणांमुळें, तो नाजूक व विरोधपूर्ण मनःस्थितींतच आपल्या खोलींत आला.

त्यानें पोषाक बदलला. शकुंतलेचीं पत्रें ताबडतोब वाचण्याची तळमळ त्याला जितकी लागली होती, तितकेंच त्याला असेंहि वाटत होतें कीं, तीं वाचण्याचा क्षण थोडा लांबणीवर पडावा. अशा द्विधा मनःस्थितींतच त्यानें खिडकींतून बाहेर नजर टाकली आणि पुढचा अलौकिक देखावा पाहून त्याचें मन अधिकच प्रसन्न झालें.

पुढें लहान-मोठे कांहीं उंचवटे दिसत असून त्यांच्यावर दाटलेल्या गार, कोंवळया हिरवळीमुळें असें वाटत होतें, कीं हिरव्या समुद्राच्या उत्तुंग लाटाच, जणूं काय, एकाएकीं स्थिरावल्या आहेत. उजव्या बाजूला बऱ्याच अंतरावर माडांच्या ओळींमधून, आपल्या दिव्य-रंगांचें वैभव उधळीत सूर्यबिंब समुद्राच्या रेषेवर टेकलें होतें आणि त्यामुळें समुद्राचा पृष्ठभाग लखलखत होता. मेघखंडांच्या आकृतीं-तून तेजाचीं कारंजीं उफाळत होतीं. नारळीची उत्तुंग राई तेजोरसानें न्हाऊन निघत होती, आणि या सगळ्यांचा मेळ इतका अद्भुतरम्य होता, कीं पलीकडे एक रहस्यमय मयपुरीच वसली आहे, असें त्याला वाटलें.

समुद्रावरून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळुकांनीं श्यामला किती तरी हुशारी आली. तो डुलत्या खुर्चीत येऊन बसला आणि त्यानें शकुंतले-चीं पत्रें वाचायला सुरुवात केली.

त्या सगळ्या पत्रांतून शकुंतलेची मनोवृत्ति स्पष्ट झाली होती, ती पाहून त्याचें मन वेगळ्याच आनंदानें भरून गेलें. पुढील पत्र त्यानें दोन-तीनदां वाचून पाहिलें.

> “ आपली आठवण झाली म्हणजे माझ्या प्रेमळ आईच्या मागं माझ्याकडे पाहणारं एक आपलं माणूस आहे, या विचारानं मला धीर येतो आणि त्याचबरोबर असंहि वाटतं, कीं आपली सेवा करण्याचं भाग्य मला मिळाल्यास मी किती तरी सुखी होईन ! श्यामकाकांचं कारखान्याचं काम कुठवर आलं आहे ? कारखान्याच्या पलीकडे नजर टाकायला त्यांना केव्हां सवड होईल कुणाला ठाऊक ! ”

वरील मजकुरांतून सूचित होणारी भावना त्याच्या हृदयाला जितकी सुखद, तितकीच जाचक झाल्याशिवाय राहिली नाहीं मातृविहीन झाल्यामुळें तिची झालेली निःसहाय स्थिति, ज्याप्रमाणें त्यांतून व्यक्त होत होती त्याचप्रमाणें त्याच्या आईवरील तिची अनन्यनिष्ठा आणि त्याच्यावरील गाढ प्रेम या भावना उत्कट रीतीनें त्या पत्रांत दिसून येत होत्या आणि म्हणून, शकुंतलेशीं विवाह करून आपण आईला वचनमुक्त करावें असा त्यानें विचार केला.

आईची प्रकृति सुधारत आहे, असें दिसून येतांच, तिचा निरोप घेऊन, तिसऱ्या दिवशीं तो शकुंतलेकडे जायला निघाला. त्यानें तिला पसंत केलेली असली तरी तिच्याशीं व तिच्या भावाशीं त्या

बाबतींत बोलणें झाल्याशिवाय आईला निश्चित उत्तर देतां येणार नाहीं, असें त्याला वाटत होतें.

संध्याकाळच्या वेळीं श्याम सदानंदाच्या–शकुंतलेच्या भावाच्या— घरीं पोंचला. तो दृष्टीस पडतांच सदानंदाला आश्चर्य वाटलें व आनंद झाला. पांच-सहा वर्षांनंतर श्यामची ही पहिलीच भेट होती. सदानंद मुंबईला होता, त्यामुळें श्यामला भेटणें त्यालाहि शक्य झालें नव्हतें.

“ श्याम, किती बदलून गेला आहेस रे तूं!–” सदानंदानें त्याच्याशीं हस्तांदोलन करीत म्हटलें.

“ म्हातारा दिसतों कीं काय मी!” श्यामनें हसून विचारलें, त्याच्या नजरेंत शकुंतलेला पाहण्याची तीव्र उत्कंठा भरून राहिली होती.

“ केस पिकले नाहींत इतकंच. बाकी मुद्रेवर गांभीर्य पसरलं आहे तें तुझ्या तरुण वयाशीं विसंगत दिसतं.”

“ सदानंद, वयावर काय आहे! गेल्या सहा वर्षांत मीं काढलेले शारीरिक व मानसिक कष्ट खरोखरच मोठे आहेत. त्यामुळं माझ्यांत तुला एवढा फरक दिसला.”

“ तुझ्यासंबंधीं बारीकसारीक माहिती आम्ही नेहमीं घेत होतों. तूं आम्हांला विसरलास पण मी–अन् विशेषतः शकुंतला–तुला विसरलों नाहीं. माझ्या पत्रांना तुझ्याकडून उत्तरं येईनाशीं झाल्यानंतर तुला पत्रं लिहिण्याचा नाद मीं सोडला इतकंच. बाकी, तुझ्या आईकडून आम्हांला तुझ्यासंबंधीं माहिती मिळत होतीच.”

“ शकुंतला मुंबईला किती वर्षे राहिली?” श्यामनें अधीरतेनें प्रश्न केला.

“ आई वारल्यापासून ती मुंबईलाच होती. तिथंच तिनं आपलं मराठी शिक्षण पुरं केलं अन् किती तरी नवीन गोष्टी तुला आवडतात

म्हणून ती शिकून आली. तुला गाणं ऐकण्याची आवड म्हणून ती गाणं शिकली."

"जरा बोलावतोस का तिला बाहेर?"

"शकुंतला..." सदानंदानें हाक मारली.

आपल्या यौवनाची आणि रूपसंपदेची जाणीव आपल्या सहजसुंदर हावभावांनीं दर्शवीत शकुंतला नाजूक पोफळीप्रमाणें येऊन दरवाजांत उभी राहिली, आणि बाहेर, बाजूला बसलेल्या श्यामकडे नजर जातांच ती सुरुवातीला लाजली, गोंधळली अन् चटकन् मान खालीं घालून दोन पावलें मागें सरकली देखील.

"शकुंतला, यांना ओळखलं नाहींस का तूं?"

"भाऊ! काय हें बोलणं! त्यांना आम्ही कधीं तरी विसरूं का?" ती मंजुळ आवाजांत हळूच श्यामकडे गोड नजरेनें पाहत म्हणाली तिचा मधुर चेहरा अनिवार उल्हासानें फुलून गेला.

नंतर तिनें श्यामला प्रश्न केला—

"आईसाहेब खुशाल आहेत ना?"

"गेल्या कांहीं दिवसांत आई आजारी होती, पण आतां बरी आहे तुझी आठवण वरचेवर काढते ती."

मनांत चाललेली अक्षम्य खळबळ तिच्या मुद्रेवर प्रतिबिंबित झाली

"या दिवसांत मी त्यांना भेटायला येणार आहे." ती भावाशेजारीं बसत म्हणाली आणि त्याच्याकडे वळून तिनें त्याला प्रश्न केला- "अन् भाऊ, केव्हां जाऊं आपण तिकडे?"

"आतां श्यामच नेईल तुला तिकडे. माझी काय गरज आतां?— सदानंद थट्टेच्या स्वरांत म्हणाला."

यावर ती गप्पच राहिली. तिचा चेहरा जास्तच आरक्त झाला.

श्यामनें तिला परकरांत पाहिली होती. त्या वेळच्या व आतांच्या स्थितींत केवढा फरक पडला होता. अवयवांचा रेखीवपणा, माधुर्य आणि गोड भाव हीं एकत्र होऊन तिच्या चेहऱ्यावर गोफ गुंफीत आहेत, असें त्याला वाटलें. तिच्या डोळयांतील पाणीदार काळेभोरपणा तिच्या भावनांची खोलीच जणूं काय दर्शवीत होता; आणि तिच्या हृदयांतील अमर्याद सोज्ज्वळ आनंद सौम्य हास्याच्या रूपानें, अविरतपणें, तिच्या चेहऱ्यावर बागडत होता.

" श्यामकाका, तुम्ही आम्हांला अगदींच विसरलात, नाहीं का ? "

श्यामनें आपला अपराधी चेहरा खालीं केला. पण, थोड्या वेळानें म्हटलें, " म्हणून तर सगळया अपराधांची शिक्षा भोगण्यासाठीं मी इथं आलों आहे." दोघेंहि भावंडें एकमेकांकडे सहेतुक पाहून गप्प राहिलीं.

शकुंतलेनें आंत जाऊन पेलाभर दूध व एक लाडू आणून श्यामच्या पुढें ठेवला.

थोड्या वेळानें तिघेंहि फिरावयाला निघालीं.

शकुंतलेचें मन आनंदानें नाचत होतें. मनांतील आशा फळाला येणार, असा रंग तिला दिसत होता.

लवकरच तीं नवीन पुलाकडे येऊन पोंचली.

तांबड्यापिवळ्या रंगांत सूर्यबिंब बुडून गेलें होतें. नदीचें पात्र दोन-तीन माड खालीं वाहत होतें. मोठमोठीं वळणें घेत नदी मध्येंच दृष्टिआड होई, फिरून एखादें वळण नजरेच्या टप्प्यांत येई व असें होतां होतां, दूरवर डोंगरांच्या आड ती समूळ अदृश्य झालेली दिसे. नदीच्या दोन्ही तीरांना लागून विस्तीर्ण मैदानें पसरलीं होतीं आणि त्यांत साचलेल्या पाण्यांतील हिरवळ खातखात गुरेंढोरें गांवाकडे

परतत होतीं. बगळ्यांचे व कावळ्यांचे थवेच्या थवे नदी ओलांडून अंतराळांतून उडून गांवच्या झाडींत अदृश्य होत. पाण्यांतून जाणाऱ्या मोठमोठ्या होड्या पुलावरून किती तरी चिमुकल्या दिसत आणि खोल पाण्यांत वास करणारी भयाणता आपल्याला खालीं ओढून तर नेत नाहीं ना, असा भास पुलावर राहून खालीं नजर टाकणाऱ्या इसमाला होत होता.

पुलाच्या सुरुवातीला मांडलेल्या बाकावर श्याम व शकुंतला बसलीं आणि सदानंद पुढें गेला.

" श्यामकाका, तुम्ही इथं याल असं मला वाटलं नव्हतं. अन् मला तरी दोन दिवसांपूर्वी कुठं ठाऊक होतं ? "

" मग आईसाहेबांनीं तुम्हांला इथं यायला सांगितलं वाटतं ? "

" तूं म्हणतेस तें एका अर्थानं खरं आहे. आईनं मला तुझीं पत्रं वाचायला दिलीं नसतीं तर..."

" मग माझीं पत्रं वाचलीं का तुम्ही ? " शकुंतला आश्चर्ययुक्त मुद्रेनें गोरीमोरी होऊन म्हणाली, " आईनं असं करायला नको होतं."

" इतके दिवसपर्यंत मला आईनं तीं पत्रं दाखवलीं नाहींत म्हणून मला तिचा राग आला ! शकू, मी तुझा अपराधी आहे." श्यामनें करुण व हलक्या आवाजांत म्हटलें.

" असं काय बोलणं हें आपलं...? "

" तुझ्याकडे मी नेहमींच दुर्लक्ष करीत आलों."

" त्यांत मी तुम्हांला दोष देत नाहीं. तुमच्यापुढं कामाचा केवढा डोंगर उभा होता ! "

" घराण्याच्या उद्धाराशिवाय मला कांहींच सुचत नव्हतं. तुझी आठवण मला होत नव्हती असं का वाटतं तुला ? पण परिस्थितीनंच

मी नाजूक भावनांना मुकलों होतों. त्याचं आतां मला किती वाईट वाटतं याची तुला कल्पना नाहीं."

"मग आतां बदलण्यासारखं विशेष कांहीं घडलं का?"

"तुझीं पत्रं, आईची इच्छा, तिनं तुझ्या आईला दिलेलं वचन, तुझ्या अंतरीची आवड आणि माझ्या मनाची ओढ या सगळ्या गोष्टींमुळंच मला इथं यावंसं वाटलं..."

शकुंतलेचे डोळे कृतज्ञतेनें भरून आले; आणि तिच्या मृत आईच्या स्मृतीनें ती सद्‌गदित झाली. किती तरी नाजूक भावभावनांची तिच्या मनांत गर्दी झाली.

"शकू, आईची सेवा करायला माझ्याबरोबर येणार ना तूं आतां?" श्यामच्या आवाजांत विलक्षण कारुण्य भरलें आणि त्याच्या मुद्रेवर भावनांचा उद्रेक दिसून आला.

"श्यामकाका! खरंच म्हणतां का हें तुम्ही... मला हें सारं स्वप्नच वाटतं... माझं भाग्य इतकं थोर आहे का?" विरोधी संवेदनांत बुडून गेल्यामुळें शकुंतला हसत होती व रडत होती.

"शकू, आईला वाटतं, तूं आमची व्हावीस, अन् मला दिखील..."

"सहा वर्षांपासून मी तुमचीच आहे...अन् तुम्ही माझे झालां न झालां तरी मी मात्र नेहमीं तुमचीच राहणार होतें... पण माझ्या आईची पुण्याई!..."

श्यामनें तिचे थरथरणारे हात आपल्या हातांत घेतले आणि प्रेमादरपूर्वक त्यांचें चुंबन घेत म्हटलें, "आमच्यावरहि अक्षता टाकायला आई अधीर झाली आहे, शकू...."

संधिप्रकाश चारी दिशांत उजळला होता. आकाशांत सौम्य, विविध रंगांचे पट्टे ओढलेले दिसत होते. तीरावरील वनस्पतींच्या

सावलींत नदी संथ, शांत वाहत होती. सगळें वस्तुजात आत्मसाधनांत केंद्रित झालें होतें.

श्यामला त्या रात्रीं झोप लागली नाहीं.

नव्या भावनांचें, नव्या संवेदनांचें वेगळेंच जग आज श्यामला दिसून आलें. व्यक्तित्व कमावून समाजांत तें स्थापित करणें हेंच कार्य त्यानें आतांपर्यंत निष्ठापूर्वक केलें होतें. तें करतांना त्यानें वृत्तीचा कणखरपणा, त्याग, लौकिक सुखांबद्दल अनासक्ति इत्यादि गुणांचा उपयोग केला होता. परंतु शकुंतलेच्या क्षणिक सहवासानंतर त्याला असें दिसून आलें, कीं आपल्या उत्कर्षविषयक महत्त्वाकांक्षा सिद्ध करतांना आपल्या मनास जो विलक्षण ताण पडत आहे, त्याचा त्रास न घेण्यासाठीं आपणास स्त्रीविषयक भावनांच्या सावलींत बसलें पाहिजे. हें मनाशीं ठरवितांना त्याला आपल्या अनारोग्याचा प्रश्न सुचला नाहीं असें नाहीं. केव्हां काय आपल्याला विलक्षण अस्वस्थता वाटते, आपल्या मस्तकांत वेदना सुरू होतात. नर्व्हस सिस्टिम तप्त होते, अशा वेळीं सांसारिक गोष्टींचा आपल्याला मनापासून तिटकारा येतो, अलोट उदासीनता आपल्या मनांत शिरते आणि सगळ्या लौकिक सुखांपेक्षां मृत्यूंतच समाधान लाभेल, असें आपल्याला निष्कारण वाटायला लागतें. या आपल्या स्थितीची त्याला आठवण झाली, तेव्हां लग्नाचा प्रश्न त्याला किती तरी गंभीर स्वरूपांत दिसूं लागला; परंतु लग्न केल्यानंतर असे आजार नाहींसे झाल्याचीं उदाहरणें त्यानें नजरेसमोर आणलीं आणि शकुंतलेसारखी प्रेमळ सखी आपल्याला लाभत असतांना बारीक-सारीक शारीरिक वेदनांना महत्त्व देण्याइतका निराशावाद बाळगण्याचा मूर्खपणा आपण कां करावा, असा त्याला प्रश्न पडला.

दुसऱ्या दिवशीं लग्नदिवस ठरविण्याला सांगून तो कारखान्याच्या कामावर निघून गेला.

*　　　*　　　*

नव्या हुशारीनें, नव्या जोमानें श्याम कामाला लागला. त्याचें मन पूर्वीपेक्षां कारखान्याच्या कामांत अधिक रमलें. माल भराभर तयार होऊं लागला; त्याला परदेशांतून मागणी येऊं लागली. त्यामुळें कारखान्याचें काम वाढून त्याचा उत्कर्ष होणार हें स्पष्ट दिसूं लागलें. काजू व सुंभ या दोन धंद्यांत आपण यशस्वी झालों, तर नारळापासून शक्य तो पक्का माल तयार करून आपण परदेशाला पाठवूं अशी महत्त्वाकांक्षाहि त्यानें बाळगली; आणि ही योजना सत्यसृष्टींत उतरल्यास आसपासच्या गांवांच्याच नव्हे, तर सबंध प्रांताच्या आर्थिक स्थितीवर त्या गोष्टीचा अनुकूल परिणाम घडून येईल अशी त्याला आशा वाटूं लागली.

थोड्याच दिवसांनीं त्याला केव्हां केव्हां सौम्य स्वरूपांत होणारी विकृति फिरून उभी राहिली. त्याच्या मस्तकांत वेदना सुरू झाल्या, पाठीच्या कण्यांत जास्तीच दुखूं लागलें, जिवाला अस्वस्थता जाणवूं लागली आणि या शारीरिक यातनांमुळें त्याच्या मनाची तळमळ सुरू झाली.

कामाच्या गडबडींत रमून जाऊन त्यानें आपला आजार विसरण्याचा प्रयत्न केला, पण त्याची अस्वस्थता वाढतच गेली आणि वेगवेगळे वाईट विचार त्याला त्रास देऊं लागले.

घराण्याच्या लौकिकासाठीं त्यानें केलेला खटाटोप, कारखान्याची उभारणी, मनांत कल्पिलेल्या औद्योगिक योजना, आईची स्थिति आणि शकुंतलेशीं निश्चित झालेला विवाह इत्यादि गोष्टी त्याच्या भीतिग्रस्त मनांत येऊन गेल्या. कांहीं दिवस त्यानें कारखान्यांतच

काढले; पण आजार कमी न होतां वाढतच गेला. अधून मधून त्याला भोंवळ येऊं लागली, त्याची स्मृति नष्ट होऊं लागली आणि एक प्रकारचें वेडच आपल्या बुद्धीचा ताबा घेत आहे असें त्याला वाटलें—

त्याला लवकरच घरीं आणण्यांत आलें.

आजाराचें तीव्र स्वरूप पाहून तो भ्याला. आपल्या बुद्धिमत्तेच्या आणि कर्तृत्वशक्तीच्या प्रयत्नाकडे पाहून आपलें दुर्दैव जणूं काय विकट हास्य करीत आहे आणि आपलें जीवित सुफल करायला आपण पूर्ण समर्थ आहों हा आपला आत्मविश्वास फोल आहे अशी दारुण शंका त्याला भेडसावूं लागली.

तो हतबल, निराश झाला.

आपलें प्रकृतिमान कळवून लवकरच त्यानें एका प्रख्यात ख्रिश्चन डॉक्टरला बोलावून घेतलें.

डॉक्टर, श्यामचा बालमित्र होता. त्याला श्यामचा इतिहास माहीत होता. त्याची बुद्धिमता आणि कर्तृत्व यांच्याबद्दल त्याच्या मनांत आदर वसत होता. त्यामुळें श्यामच्या पत्रांतील मजकूर वाचून त्याच्या वाडिलांचा भूतकाळ डॉक्टरच्या नजरेसमोर उभा राहिला आणि त्याचें हृदय थरारलें!

श्याम अधीर मनानें डॉक्टरची वाट पाहत बसला होता. डॉक्टर शांत मुद्रेनें त्याच्या खोलींत शिरला. उभयतांनीं हस्तांदोलन केलें. डॉक्टरच्या हस्तस्पर्शात श्यामला वेगळ्याच भावनांची प्रचीति येऊन तो चमकला.

थोडा वेळ गप्पागोष्टी झाल्यावर डॉक्टर एकाग्रचित्तानें त्याची एकांतांत तपासणी करूं लागला. श्याम त्याच्या मुद्रेवरील सूक्ष्म बदल लक्षपूर्वक पाहूं लागला.

डॉक्टरच्या मनांत चाललेला दारुण झगडा त्याच्या चेहऱ्यावर उमटूं लागला.

श्यामचें मन तळमळूं लागलें. त्यानें करुण पण निश्चयी स्वरांत म्हटलें—

" डॉक्टर, मला खरं सांगायला कचरूं नकोस. अगदीं शांत मनानं केवढाहि वाईट निकाल ऐकायला माझी तयारी आहे. आयुष्यांतील झगड्यानंच मला एवढा धीर दिला आहे."

—आणि हें बोलतांना आई आणि शकुंतला यांची आठवण होऊन त्याचें हृदय असहायपणें आक्रोश करूं लागलें.

डॉक्टर आपली स्थिर, निर्विकार भूमिका विसरला. आपल्यापुढें आपला कर्तृत्वशाली, बुद्धिवान्, पण दैवाच्या माऱ्यानें सध्यां मातीमोल ठरलेला मित्र बसला असून त्याला जीवदान देणें कुणाच्याहि हातांत नाहीं, ही जाचक वस्तुस्थिति पाहून त्याला अतिशय दुःख झालें. भावनांच्या आवेगांत श्यामला दृढालिंगन देत त्यानें म्हटलें.

" Shama,! tu e's disgracado! (श्याम! तूं किती अभागी आहेस!) वडिलांच्या पापाचं फळ भोगण्यासाठीं, आयुष्यावर तिलांजलि देण्याची तयारी केली पाहिजेस तूं... "

अलोट धीर आणि अनिवार निराशा यांचा एकच कल्लोळ त्याच्या हृदयांत उडाला. पलंगावर अंग टाकून त्यानें कातर स्वरांत म्हटलें, " माझी आई! माझी शकू!—"

समुद्राची घोर घरघर ऐकूं येत होती. आकाशाच्या अनंत अवकाशांत काळेकुट्ट ढग सैरावैरा धावत होते.

---

*

# गांवकऱ्याचा संदेश

त्या प्रचंड पडक्या वाड्याच्या भयानक दर्शनानें माझ्या मनांत विलक्षण हुरहुर उत्पन्न झाली. त्याच्या काळ्याठिक्कर भिंतींचा वरचा भाग कोसळला होता. सभोंवतीं वाढलेल्या दाट झाडींत त्याचा खालचा भाग लपला होता. त्या झाडीच्या काळ्याभोर सावलींत भयाणताच जणू काय वास करीत होती, आणि असहाय अर्भकांचा बळी घेऊं पाहणाऱ्या नरराक्षसावर अकस्मात् वीज कोसळून त्याचा नाश व्हावा, त्याप्रमाणें त्या गांवांतील लहान लहान, साध्या पण डौलदार घरांना ग्रासून टाकण्याच्या आविर्भावानें उभ्या असलेल्या त्या वाड्याची कोणत्या तरी प्रचंड शक्तीनें दुर्दशा करून टाकली आहे असेंच मला वाटलें.

तो बाग ज्या उंचीवर होता तिथून खालीं पसरलेला गांव स्पष्ट दिसत होता. नारळीच्या लांबच लांब राईत असंख्य छपरें डोकावून

पाहत होतीं. पुढें विशाल शेत विस्तारलेलें असून त्याच्यामधून कालव्याची नागमोडी हद्द दिसत होती. शेताच्या कडेला एक लहानशी टेकडी उभी होती आणि तिच्यावर एक चिमुकलें देऊळ, गांवचा प्रतिपाळ करण्यासाठीं जणूं खडें होतें. त्याच्यापुढें पिंपळाच्या पारावर लाल गुढ्या फडफडत होत्या.

वाड्यापुढची पाज उतरून मी गांवांत आलों. त्या घरांच्या पुढील अंगणांत कुठें तणानें बांधलेल्या माताच्या मोटल्या रचून ठेवलेल्या दिसत, कुठें काजूंच्या बियांचे ढीग संध्याकाळच्या किरणांत सौम्य रीतीनें चमकत, तर कुठें नारळाच्या राशी घातलेल्या दिसत. जिथें तिथें गांवच्या बाया आपापल्या कामांत दंग होत्या; व जवळच त्यांचीं मुलें आपापल्या गांवठी खेळांनीं त्या श्रमशील जीवनांत चैतन्य ओतीत होतीं.

हें दृश्य पाहत मी चाललों होतों. पुढचें शेत रेखीव कुणग्यांनीं विभागलेलें दिसत होतें. कालव्याचें पाणी त्यांतून खेळाविलें असून त्यांत बोटबोट कोंवळें लुसलुशीत शेत वाढलें होतें आणि त्यामुळें चकचकीत आरशावर हिरवें, विरल रेशमी वस्त्र पसरल्यासारखी अजब मोहिनी त्याला लाभली होती.

गांवच्या तोंडाला असलेला भयाण वाडा, शेतांच्यामधून गेलेला तो दीर्घ कालवा, शेतांच्या कडेला असलेली ती टेकडी, तिच्यावरील तें चिमणें देऊळ इत्यादिकांच्या दर्शनानें माझ्या मनांत जिज्ञासेचे तरंग उठूं लागले आणि मी त्या शेतांत उतरलों.

उन्हें मंदावत चाललीं होतीं; आणि नदीवरून येणाऱ्या वायुलहरी त्या हिरव्यागार शेतावरून नाचत जाताहेत असें वाटत होतें.

मी कालव्याकडे पोंचलों. कालव्याची ती नागमोडी पट्टी इतक्या

दूरवरून आली होती, कीं पाहणाऱ्याला ती अदृश्यांतूनच आल्याचा भास व्हावा.

मी त्याच्या कांठानें चालत टेकडीच्या पायथ्याशीं येऊन पोंचलों. तिथें मला एक गांवकरी दिसला. दिवसाच्या काबाडकष्टानें दमल्यामुळें थोडा वेळ विश्रांति घेण्यासाठीं एका दगडावर तो आपली घोंगडी टाकून बसला होता. त्याचा वेष गरिबाचा दिसत होता. पण त्याच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावरील भाव मालकाचे होते. त्याच्या पिकलेल्या कल्लेदार मिशा त्याचा मोठेपणा दर्शवीत होत्या. त्यानें ढुंगणाला गुंडाळलेला पंचा फाटका होता; परंतु त्याची बसण्याची ढब, कमरांतलें गळूं पाहणारें रुप्याचें कांड या गोष्टींवरून त्याला आपल्या स्थितींत कोणतीचि उणीव भासत असल्याचें दिसत नव्हतें.

मला पाहतांच किंचित् ऐटीनें आपल्या मिशांवरून हात फिरवीत तो म्हणाला, " खंय चल्लो गा तूं तीळसांदेर ? "

त्याचा वेष व वृत्ति यांच्यामधील तो विरोध पाहून मी कांहींसा भांबावलोंच होतों. आणि त्याच्या भाषणांतील आपुलकी, सत्कारशीलता व स्वाभिमानदर्शक डौल यांचा परिणाम माझ्या मनावर बराच झाला होता. मीं त्याला म्हटलें, " तुमचा गांव पाहायला आलों होतों. म्हटलं, देवाला नमस्कार करून जावं."

माझे हे उद्गार ऐकून म्हाताऱ्याचा चेहरा खुलला. तो चटकन् उठला आणि देवळाकडे वळून त्यानें एक पाऊल पुढें टाकीत मला म्हटलें, " चला, मीहि येतों तुमच्याबरोबर नमस्काराला."

आणि इतकें बोलून तो पुढें चालूं लागला; मीहि त्याच्या मागोमाग ती टेकडी चढूं लागलों.

तें देऊळ अगदीं लहान असून पुढें विस्तृत अंगण होतें. देवभेट घेतल्यावर आम्ही दोघेहि तिथल्या एका पाषाणी चौथऱ्यावर बसलों.

" बामणा, आहांतना तुम्ही इकडे दोन दिवस ? " माझ्याकडे वळून म्हाताऱ्यानें विचारलें.

" उद्यां मला परतलं पाहिजे."

" तसं कसं होईल ? उद्यां आमच्या गांवचा काला. इथं उद्यां जला भरेल. आसपासच्या गांवचे शेंकडों लोक तुम्हांला इकडे दिसतील. आमचा ग्रामपुरुष मोठा प्रखर आहे. त्याच्या भेटीसाठीं दूरदूरचे लोक मुद्दाम इकडे येतात आणि तुम्ही जाणार म्हणतां ? "

म्हातारा आतां खूप बोलणार असा त्याच्या मुद्रेवरून रंग दिसला. गांव पाहून जागृत झालेल्या कुतूहलाचें समाधान होणार असें मला वाटलें. म्हणून त्याला खुलविण्यासाठीं मीं म्हटलें,

" या गांवचा आणि देवस्थानचा लौकिक माझ्याहि ऐकिवांत आहे."

" आतां कसं छान बोललांत ! उद्यां दिसेलच तुम्हांला आमच्या देवाचा व गांवचा मोठेपणा ! "

" मग गांवची मोठमोठी श्रीमंत आणि जमीनदार मंडळी उद्यां इकडे जमणार तर ? "

हे शब्द ऐकून त्या म्हाताऱ्याचा स्वाभिमान दुखलासें दिसलें. त्यानें कुर्रेबाजपणें माझ्याकडे पाहत ठसकेबाज शब्दांत हावभाव करीत म्हटलें—

" काय वेड्यासारखं बोलतां बामणा ? या गांवचे जमीनदारहि आम्ही अन् भागेलीहि आम्ही. आम्हीच मालक व आम्हीच नोकर ! महाराप्रमाणं खपावं अन् राजाप्रमाणं खावं हें आमचं ब्रीद ! ... "

" वाईट वाटून घेऊं नका म्हातारेबाबा. मला काय बरं माहीत इकडच्या गोष्टी ? "

" त्याच सांगायला तर मी इथं तुमच्याबरोबर येऊन बसलों." मी स्तब्धच राहिलों. माझी ओशाळलेली मुद्रा पाहून म्हातारा मोठ्या आवेशानें पुढें म्हणाला,

" हें दैवत मोठं जागतं आहे आणि त्याच्याच कृपेमुळं आम्ही गांवकरी या गांवचे अजूनपर्यंत धनी आहोंत. आमच्या देवाचा प्रताप तुम्हांला इथं उद्यां दिसेल. ग्रामपुरुषाच्या अवसरानं एकदां "तरंग" वेगांत धरून शिळेवर ठेवलं म्हणजे तें हाताच्या आधाराशिवाय खुंटा-प्रमाणं ताठ उभं राहतं. तो तिथं तुम्हांला रांजण दिसतो ना? त्याच्यावर उद्यां कढई चढेल आणि त्यांतल्या उकळत्या तेलांतले वडे ग्रामपुरुषाचा अवसर हात घालून काढील. असली जागती " सासाय " तुम्हीं कधी कुठं पाहिली आहे ? आतां असे गप्प कां ? आणि आम्हां गांवकऱ्यांचा मान केवढा हेंहि पण उद्यां तुम्हांला दिसेल. आमचा हा फाटका पंचा अन् ही धाबळी पाहून तुम्हांला वाटेल, हें गांवकार दरिद्रीच! पण या ग्रामपुरुषाच्या कृपेनं आम्हांला कांहीं उणं नाहीं. हातांत गोठ-पाटल्या घालून, रेशमी पातळं नेसलेल्या तरण्याताठ्या अन् देखण्या भावणी आम्हांला गुडगुड्या भरून देण्यांत अन् आमची सेवा-चाकरी करण्यांत धन्यता मानतील ! "

" अस्सं ! मग तुम्ही भाग्यवान् खरे ! " मीं उपहासगर्भ स्वरांत म्हटलें.

" आतां अगदीं बरोबर बोललांत. हें पहा, मला स्वतःला आपला मोठेपणा सांगणं फारसं आवडत नाहीं, पण तुम्ही इथं नवीन म्हणून तुम्हांला सगळं सांगावं लागतं—"

त्याला प्रोत्साहन देण्यासाठीं मीं म्हटलें,

" सांगा गा गांवकारा, तुमच्या तोंडच्या गोष्टी ऐकून मला फार आनंद वाटतो—"

म्हाताऱ्यानें कानावरची भली विडी काढून तोंडांत घातली व मुंडाशांत खोवलेली चकमक काढून तिनें विडी पेटवली. डोळे मिटून एक-दोन झुरके मारल्यानंतर त्याचें बोलणें पुन्हा चालू झालें—

" आमच्या पुरुषाची आम्हांवर एवढी कृपा, कीं त्या तिथं दिसणाऱ्या प्रत्येक घरांत वर्ष-दीड वर्ष सहज पुरेल इतका दाणागोटा माळ्यावर बांधून ठेवलेला तुम्हांला दिसेल. आम्हांला कांहींच उणं नाहीं. भट, परीट, न्हावी, घाडी, भगत, सुतार, लोहार, महार, चांभार हे सगळे आमचे सेवेकरी आहेत आणि हे सारे आम्हीं गांवकऱ्यांनीं तोडून दिलेल्या इनामावर आमचं फुकट काम करतात. पैशाचा मोठेपणा आम्हांला काय होय, महाराजा! आमच्या या गरिबींतच आम्ही पाच्छाहून सुखी ! "

इतकें बोलून त्यानें आपल्या दोन्ही गालांवर मारून घेतलें आणि देवाकडे वळून त्याला हात जोडून आवाज खालवून म्हटलें,

" पण ही सगळी पुण्याई त्या देवळांत बसलेल्याची! आम्हां माणसांच्या उडया त्या किती? आम्हीं आज सुखानं व मानानं जे दोन घांस खातों ते त्याच्याच दयेनं. तसं नसतं तर या गांवची काय गत झाली असती देव जाणे! "

इतकें बोलून त्यानें दीर्घ सुस्कारा सोडला. त्याचे शिणलेले डोळे भक्तिभावानें ओले झाले.

" फार जुन्या काळची गोष्ट, तशी फार जुनी नव्हे; माझ्या आजोबा-

च्या वेळची. तो तिथं कालवा दिसतो ना शेतांत, तो त्या वेळीं नव्हता. त्यामुळं वांयगणहि नव्हतं. सगळ्या गांवाला एकाच पिकावर गुजरण करावी लागे. एकदां अवर्षण पडलं. एका महिन्याला पुरेसं दिखील पीक निघालं नाहीं. पोरंबाळं तडफडूं लागलीं. गांवांत हाहाःकार उडाला! गांवकरी देवळांत जमले आणि कोस-दीड कोस अंतरावरच्या तळ्याचं पाणी पाट फोडून शेतांत आणून वांयगण पिकवावं असं गांवच्या बुधवंतांनीं ठरवलं. पण या कामाला वीस-पंचवीस हजार "असुर्फ्यां"ची गरज होती. इतके पैसे गांवकऱ्यांकडे कुठले? त्यांनीं देवाला गाऱ्हाणं घातलं. देवाचा अवसर आला. त्यानं त्या वाड्याकडे बोट दाखवलं."

असें म्हणून गांवकऱ्यानें मला वाटेंत लागलेल्या त्या मोडक्या वाड्याकडे बोट दाखवलें.

"चौघे बुधवंत एकत्र जमून त्या वाड्याच्या मालकाकडे गेले व त्यांनीं त्याला आपला हेतु सांगितला. शाणू पैनीं नकार देतांना म्हटलें, "एवढी रक्कम माझ्याकडे कुठली असायला! अन् जी थोडी आहे ती तुम्हांला देऊन बसलों तर माझ्या मुलांना तुमच्याप्रमाणें नांगर धरावा लागेल."

शाणू पैचे हे शब्द ऐकून बुधवंतांना मोठें दुःख झालें व त्यांतला जाणता पैना म्हणाला, "शाणूदादा, हा प्रसंग तुम्हीं ओळखला पाहिजे. गांवावर ते घरावरहि. वडिलांची शिकवण तुम्हीं-आम्हीं विसरतां कामा नये. गांवचं तें तुमचं व तुमचं तें गांवचं, ही रीत आजवर तुमच्या वाडवडिलांनीं पाळली आणि म्हणूनच एका काळीं ग्रामपुरुषाच्या अवसरानं, टेकडीवर पुरून ठेवलेले गांवच्या मालकीचे सात हाडे

तुमच्या आजोबाच्या हवालीं केले आणि त्यांना सांगितलं, 'खळू, तुझं पूर्व स्मरून गांवचं हें धन मी तुझ्या स्वाधीन करतों. ही माझी मठी, लेंकरं कधींकाळीं अरिष्टांत सापडलीं, तर तूं व तुझ्या मुलां-बाळांनीं त्यांना पोटाशीं धरलं पाहिजे. हें धन सगळयांचं हें मात्र विसरूं नकोस.' "

म्हाताऱ्या गांवकऱ्याचे हे शब्द ऐकून शाणू पै तुच्छतेनें हसून म्हणाला,

" गांवकऱ्यांनो, तुम्हांला काय मी लहान पोर वाटतो? अवसर हांडे देते तर आम्हांला कशाला सावकारी हवी होती? "

इतकें बोलून त्यानें कानांवर हात ठेवले. गांवकऱ्यांनीं त्यांच्यापुढें आंसवें ढाळलीं, तरी कांहीं त्यांना गांवची दया आली नाहीं. निराश होऊन ते तिथून परतले.

—आणि थोड्याच दिवसांनीं त्या वाड्यावर एका रात्रीं दरोडा पडल्याची बातमी सर्वत्र पसरली!

दरोड्यांत शाणू पैची सगळी संपत्ति लुटली गेली आणि घरच्या माणसांपैकीं कोणीहि जिवंत राहिलें नाहीं. सरकारनें कसून चौकशी केली, बऱ्याच गांवकऱ्यांना आफ्रिकेंत हद्दपार केलें; पण संपत्तीचा कुणालाच मागमूस लागला नाहीं.

पण पुढच्या वर्षीं गांवकऱ्यांचे देखरेखीखालीं कालव्याचें काम सुरू झालें.

" —आणि त्या वेळेपासून हें एवढं मोठं वांयगण पिकूं लागलं व सारा गांव सुखासमाधानांत नांदूं लागला."

तो थांबला. ताशानगाऱ्याचें तुंबळ वाद्य वाजतां वाजतां अकस्मात् थांबलें म्हणजे जसें वाटतें तसें मला झालें.

तो उठून त्या चौथऱ्यावर उभा राहिला. ‘गांवाच्या व देवाच्या भूतकालीन वैभवाची व थोरवीची ज्योतच जणूं काय त्याच्या सर्वांगांतून चमकली. मीं त्याच्याकडे विनम्र भावानें पाहिलें आणि आकाशाच्या भव्य निळया पडद्यावर त्या म्हाताऱ्या गांवकऱ्याची उदात्त मूर्ति मला एकसारखी उंचावत चाललेली दिसली.

---

# भाग्यवंत

मी आज पंधरा वर्षं संसार करीत होतों. तसं पाहिलं तर माझा संसार म्हणजे पांच-सहा माणसं— मी, माझी बायको, दोन मुलं अन् म्हातारी आई. एवढ्या माणसांचा व्याप म्हणजे कांहीं मोठा नव्हे; पण कां कुणास ठाऊक, मला त्या दिवसांत अगदीं उबग आला होता. नात्यागोत्याचीं इतर माणसं मला येऊन त्रास देत होतीं, किंवा गरीब विद्यार्थी आश्रयासाठीं माझ्याकडे होते असं नव्हे. माझी मिळकत मोठी नसली तरी ती संसाराला पुरून उरे. अन् त्यामुळंच बायकोनं कांहीं " माया " जवळ केली होती. पण इतकंहि असून, त्या रामरगाड्यांत मी इतका गुंतून गेलों होतों, कीं आसपास पाहायला किंवा दुसरं कांहीं करायला मला फावत नसे. शेवटीं जीव अगदीं कावून, त्रासून गेला. अन् वाटलं, संसाराची ही घोरपड थोडा वेळ बाजूला सारून कुठं तरी जावं.

एकाच गांवांत जन्मभर कुजत पडलेले आम्ही लोक! आम्हांला बाहेरच्या जगांत फिरून येण्याचं भाग्य कुठून लाभणार? तें भाग्य नशिबीं नाहीं, तोंवर या दुर्भागी प्रांतांतच कुठं तरी भटकून यावं, असा मनाशीं विचार केला. तेव्हां मला माझ्या विद्यार्थि-दशेंतील एका दोस्ताची आठवण झाली!

गोपाळराव म्हणजे लाख मोलाचा माणूस! विद्यार्थि-दशेंतच त्याचे बहुतेक गुण माझ्या परिचयाचे झाले होते. जीवन हें आपणा स्वतःसाठीं नसून तें इतरांसाठीं आहे, ही जाणीव त्यांना जन्मतांच होती कीं काय कळत नाहीं! पण संसाराचा बहुतेक मार्ग आक्रमण केल्यानंतर आणि जगांतील महाभागांचीं चरित्रें वाचल्यानंतर, जें इतरांना कळे, तें गोपाळरावांना स्वभावतःच कळत होतं. इतकंच नव्हे, तर तें त्यांच्याकडून घडत होतं. अशा या व्यक्तीची भेट झाल्याला किती तरी वर्षे लोटलीं होतीं. संसारामुळं जणूं आम्ही एकमेकांना दुरावलों होतों.

गोपाळरावाच्या स्मृतीनं मागच्या किती तरी गोड गोष्टी माझ्या मनांत जागृत झाल्या. त्यांना पाहावं, त्यांच्या पवित्र सहवासांत कांहीं दिवस घालवावे अन् मन जरा मोकळं, व्यापक करावं असं ठरवून मी घरांतून बाहेर पडलों.

* * *

आठ-दहा वर्षांपूर्वीची गोष्ट. त्या वेळीं खेडवळ गांवांतून चांगले रस्ते नसल्यामुळं मोटारींची सोय नव्हती. एका गांवांतून दुसऱ्या गांवांत पायींच जावं लागे. मी सकाळीं चालूं लागे. दुपारच्या वेळीं एखाद्या गांवांत जेवण घेई. मग फिरून माझी पायगाडी सुरू होई ती अंधार पडेपर्यंत चालूं राही. नंतर, एखाद्या खेड्यांत चांगल्याशा जागीं मी मुक्काम करी. या प्रवासांत उघड्या डोळ्यांनीं मी सगळं पाहत असे

अन् मोकळया मनानं मी माझ्या समाजबांधवांच्या आयुष्याचं निरीक्षण करीत असे. असं करतांना, बराच काळपर्यंत एका जागीं कोंडलेलं पाणी एकदम वाहूं लागावं तसं माझ्या मनाचं झालं होतं.

मोठ्या मजेंत ही माझी सफर चालू होती. वाटेंत त्रास होई, अडचणी येत, जेवणाखाण्याच्या बाबतींत गैरसोई उद्भवत. पण या कष्टांतच एक प्रकारचा उल्हास होता. चार भिंतींच्या आवारांत देहाला व मनाला कोंडून लाभणाऱ्या सुखसोईपेक्षां उघड्या जगावर वावरतांना येणारे खडतर अनुभव देखील नावीन्यपूर्ण, आकर्षक व चैतन्यदायी वाटत.

एकदां दुपारच्या वेळीं एका गांवांत पोंचलों. सतत तीन-चार तास डोंगरी वाटांतून चालल्यामुळं जीव कासावीस झाला. उष्णतेमुळं मस्तक तापून गेलं अन् पोटांत भुकेचा डोंब उडाला. अन्न-पाणी कसं मिळेल हा प्रश्न पडला. खिशांत पैसे होते, पण त्या लहानशा गांवांत खानावळ नव्हती. दुकानांतून जिन्नस विकत आणून जेवण तयार करण्याइतकी शक्ति व धीर नव्हता. मी आसपासच्या घरांकडे नजर टाकीत चालत होतों. पण तीं घरं तरी कसचीं? झोपडींच तीं. त्यांतील वस्तीची मला लगेच कल्पना आली. दारिद्य अन् दैन्य यांचं लांबलचक प्रदर्शनच होतं तें जणूं! अंगणांत उघडीं-नागडीं कृश पोरं, विहिरीचं पाणी काढणाऱ्या किंवा भात कांडीत असलेल्या ओंगळ व जीर्ण वस्त्रं नेसलेल्या बायका. झोपड्यांना खिडक्या नाहींत कीं झरोके नाहींत. आंतील अंधाराची बाहेरून चांगली कल्पना होईल, अशा या वस्तींत माझ्या जेवणाची कशी व्यवस्था होईल, या विवंचनेंत मी एकेक पाऊल टाकीत होतों.

माणसं दरिद्री दिसलीं. पण निसर्गाचा वरदहस्त खेड्याच्या भूमी-वर होता असं आसपासच्या देखाव्यावरून वाटलं. अरुंद पण लांबच-

लांब अशा शेतांच्या पट्ट्यांत भात पिकून तयार झालं होतं. त्यामुळं सगळा प्रदेश पिवळा दिसत होता. डोंगराच्या पायथ्याशीं पसरलेल्या विस्तीर्ण कुळागरात पोफळाचीं उंच, नाजूक व सुंदर झाडं दाटीनं उभीं होतीं आणि आंत वाढलेल्या गोंडस केळींमुळं तो प्राकार हिरवाचार दिसत होता. जिथं तिथं माडांचे बांध दिसत होते आणि ओळीनं लावलेल्या नारळीचीं झाडं नारळांच्या भरगच्च पेंडांनीं जणूं काय वाकलीं होतीं.

पण, भूमातेचं हें वैभव अन् हें औदार्य तिच्या लेंकरांना उपयोगी पडत नव्हतं हें स्पष्ट दिसत होतं.

नारळीच्या सावलींतून मी सावकाश चालत होतों. एखाद्या झोपडींत जाऊन तांदळाचे गोटे उकडून खावे अशा विचारांत होतों. इतक्यांत, एक गांवकरी येतांना दिसला. तो जवळ येतांच मीं त्याला थांबवून विचारलें, "या गांवांत बामणाचीं घरं नाहींत का ?"

"तुम्हांला कुठं जायचं आहे ? तुम्ही इथं नवीन दिसतां." तो माझं निरीक्षण करीत म्हणाला.

"मी परगांवचा आहें. माझी इथं ओळख नाहीं. आतां बारा वाजून गेले आहेत. अन् मला तर भूक लागलेली आहे. बामणाचं घर जवळपास असलं तर माझी सोय होण्याची आशा आहे."

"या गांवांत बामणांचीं घरं अशीं नाहींतच. सगळी वस्ती आमच्या-च लोकांची. नाहीं म्हणायला एक घर आहे खरं. पण तुम्हांला त्याचा किती उपयोग होईल हा प्रश्नच आहे." इतकं बोलून तो किंचित् विचारांत पडला.

थोड्या वेळानें तो म्हणाला, "इथून दोन हाकांच्या अंतरावर तुम्हांला तें घर दिसेल. तें घर कसलं म्हणा, राजवाडाच तो. पण त्या

राजवाड्यांत भिकारी राहतात!" आणि इतकं त्वेषानं बोलून तो आपली वाट चालूं लागला.

त्याच्या सूचनेप्रमाणं, मी बराच चालून गेलों. गांवाच्या टोकाशीं झाडांच्या मधून मला एक शुभ्र इमारत दिसली. भिकाऱ्यांचा हा राजवाडा कसा असेल हें जाणण्याच्या उत्सुकतेनं मीं लवकरच, घरा-पुढील पटांगणांत प्रवेश केला.

अंगणांत मोठी बाग होती. अन् मधें कारंज्याचे फवारे उडत होते. हें दृश्य खास भिकाऱ्याचं नव्हतं.

मी बाहेरच्या बाल्कनीवर आलों. तिथं तीन नोकर लोळत पडून आपापसांत हळूच बोलत होते. मला पाहतांच त्यांनीं प्रश्नार्थक मुद्रा केल्या. मी बॅग जमिनीवर ठेवून आधीं बाकावर बसलोंच. घामानं आंतील शर्ट भिजून चिंब झाला होता. अन् घशाला कोरड पडली होती. कारंज्याचं पाणी पाहून अन् तें मोठं घर पाहून थोडा आराम वाटला व आशाहि वाटली.

नोकर आपल्या संभाषणांत फिरून दंग झाले. तेव्हां मी त्यांना म्हटलं, "धनी आहेत का घरांत?"

हा प्रश्न ऐकून त्यांनीं एकमेकांकडे पाहिलं. त्यांचे चेहरे पाहून मला असं वाटलं, कीं माझ्या प्रश्नाला उत्तर करणं म्हणजे त्यांना मोठं संकट वाटलं असावं.

थोडीशी चुळबूळ केल्यानंतर त्यांपैकीं एकटा उठला आणि आंत निघून गेला. घाम पुशीत आणि या राजवाड्यांतील भिकाऱ्यांचं रहस्य पाहण्यासाठीं मनाची तयारी करीत मी तिथंच अर्धा तासपर्यंत बसून राहिलों.

शेवटीं नोकर धावतच बाहेर आला व त्यानं मानेनंच खूण करून मला आंत येण्याबद्दल सुचवलं. मी मोठ्या आशेनं त्याच्या मागोमाग आंत गेलों. मला एका माडीवर नेण्यांत आलं. तिथं एका लोडाशीं बसलेली एक उतारवयाची व्यक्ति दिसली. तिला पाहतांच मला धक्का बसला. जडजवाहिरानं भरलेल्या पेटींत हात घालावा अन् तिथं सापाची फडा दिसावी, तसंच मला झालं! देहाचा अस्थिपंजर झालेला; निस्तेज डोळ्यांत बुभूक्षेची चमक; सगळं जग आपल्यावर उलटलं असून तें खायाला उठलं आहे अशा भीतीनं चेहरा काळवंडलेला! हें ध्यान पाहून मी दचकून जागच्या जागीं उभाच राहिलों. त्या वाड्याचा तो धनी होता, हें स्पष्ट होतं.

त्यानं मला जवळच्याच सतरंजीवर बसायला सांगितलं. मी बसलों. तो माझ्याकडे वांकून, आतुरतेनं म्हणाला, "माझ्याकडे काम आहे का तुमचं?"

त्याचं तें भयानक स्वरूप पाहून, माझं काम त्याच्यापुढं उघडं करण्याची मला लाज वाटली. दोन प्रहरीं घामाघूम होऊन आलेल्या परक्याला जो आधीं कामासंबंधीं प्रश्न विचारीत आहे, त्या माणसाची दानत मला लगेच कळून चुकली. पण, कांहीं तरी उत्तर द्यायचं म्हणून मीं म्हटलं "हो."

"मग केवढ्या रकमेची आपल्याला गरज आहे?"

हा प्रश्न ऐकून मी गोंधळून गेलों. हा माणूस वेडा तर झाला नाहीं ना? असा मला संशय आला. पण, त्याच्या प्रश्नाच्या रोखानंच मीं उत्तर केलं, "आपण द्याल तेवढी रक्कम मला पाहिजे आहे!"

"मग तुमचे दागिने दाखवा पाहूं!" त्यानं हात हलवीत म्हटलं.

आतां मात्र माझ्या मस्तकांत प्रकाश पडला. व्याजबट्टयाचा व्यापार

करणारा हा ब्राह्मण मारवाडी असून, याच्या घरांत, असले गरजवंत तेवढेच येतात हें मला कळून चुकलं !

मीं म्हटलं, "साहेब ! मी दागिने नाहींत आणले. मला आपली रक्कम नको आहे !"

"मग ?...मग... ?" आश्चर्ययुक्त संतापानं पाहत तो म्हणाला.

"मी वाटसरू आहे, मला भूक लागली आहे !" मीं निर्लज्जपणानं सांगितलं. माझ्याकडे संतापानं पाहत, त्यानं मान खालीं घातली व तो हिशेबाच्या वह्या चाळूं लागला !

मी त्याचा निरोप न घेतांच तडक खालीं आलें, आणि माझी बॅग हातांत घेऊन तिथून बाहेर पडलें !

बागेंत फुलं हसत होतीं व त्यांचा सुवास सगळीकडे दरवळत होता. सूर्यकिरणांत, कारंज्याचे तुषार चमकत होते आणि त्या राजवाड्यांत तो भिकारी बसला होता.

* * *

एका गांवकऱ्याकडेच मला उतरावं लागलं. नुकताच आलेला अनुभव मीं त्याला सांगितला. तेव्हां तो भेसूर हास्य करीत म्हणाला, "त्याच्याकडे जाण्यापूर्वी तुम्हीं कुणालाहि कसं नाहीं विचारलंत ? हजारों रुपयांचा व्याजबट्टा करावा अन् लोकांना पिळून काढावं, हा त्या घराण्याचा धंदाच आहे. या गांवांतील अर्ध्याअधिक जमिनी त्याच्या मालकीच्या आहेत. वर्षाला दहा-पंधरा हजार रुपये तो आपल्या जमिनीच्या उत्पन्नाचे घेत असतो. शिवाय, हा सावकारीचा धंदा ! त्याच्या तावडींत सांपडलेला गांवकरी सुखरूप कसचा सुटतो ? आम्ही या गांवचीं लेंकरं; पण आम्हांला या जमिनीचं उत्पन्न मिळत नाहीं. गांवच्या सगळ्या रयताला वर्षाकांठीं जेवढं उत्पन्न मिळत नाहीं, तेवढं

उत्पन्न याला कोणत्याच सायासाशिवाय मिळतं. आणि या संपत्तीचा उपयोग काय? —तर रयतेची पिळणूक!"

मीं जेवण उरकून घेतलं अन् थोडा वेळ विश्रांति घेण्यासाठीं अंगणांत घातलेल्या चुडिताच्या मंडपाखालीं आडवा झालों.

सांखळीला जाणारा वाफोर त्या गांवांत बंदर करीत होता. मला सांखळीला गोपाळरावांकडे जायचं होतं. म्हणून मीं तीन वाजतां उठलों गांवकऱ्याचे आभार मानून तिथून निघालों.

गोमंतकांतील खाड्यांत वाफोरांतून प्रवास करणं किती मजेदार असतं! एखाद्या पक्ष्याप्रमाणंच सुटसुटीत अशी ती इवलीशी बोट पांच-पंचवीस उतारूंना घेऊन चालूं लागली! एखादं वळण आलं म्हणजे पुढचा देखावा पाहायला मन किती अधीर होई! निरनिराळ्या प्रकारची झाडी अन् शेतं नदीच्या तीरावर रांगेनं लागून राहिलीं होतीं. वाऱ्यानं भरलेलीं शुभ्र शिडं उभवीत लहान-मोठ्या होड्या आमच्या जवळून मजेदार रीतीनं जात होत्या. टीचभर पन्हेळांत बसून कोळीलोक जिकडे तिकडे मासळी मारीत होते.

मोकळ्या संभाषणाला बोटीसारखी उत्तम जागा दुसरी कुठं आढळणार? घुम्या वृत्तीचे इसम दिखील तिथं बोलके होतात, औदार्याला ऊत येतो अन् निरपेक्ष रीतीनं प्रवासी एकमेकांची चौकशी करतात; अन् त्यामुळंच संभाषणाला रंग भरतो.

माझ्या जवळ दोन गृहस्थ बसले होते. हलक्या आवाजांत त्यांनीं बोलावयास सुरुवात केली अन् लगेच त्यांचं संभाषण सगळ्यांना ऐकूं येऊं लागलं. पोषाकावरून पाहतां दोघेहि गरीबच दिसले. त्यांपैकीं एकटा म्हणाला, "काय सांगूं तुला म्हाळू! इतके वकील पाहिले, पण गोपाळरावांची सर कुणालाच नाहीं यायची!"

"खरं आहे तुझं म्हणणं. 'भतग्राम' तालुक्यांतील सगळे लोक त्यांना गरीबांचा वकील म्हणून ओळखतात. आमच्यासारख्या गरीबांना कुणी निष्कारण त्रास देऊं लागला किंवा सत्तेच्या, संपत्तीच्या जोरावर आमची जमीन अपहारूं लागला, तर गोपाळराव देवाप्रमाणं उभे रहातात! देव त्यांचं बरं करो." दुसरा गृहस्थ म्हणाला.

माझ्या मित्रासंबंधीं त्यांचं बोलणं केवढा वेळपर्यंत चाललं होतं. त्यांच्या संवादांतून मात्र असं कळून आलं कीं, गोपाळराव सध्यां वकिली करीत असून, या धंद्यांत ते आपल्या अंगच्या गुणामुळं, अतिशय लोकप्रिय झाले आहेत. माझ्या मित्रासंबंधीं हें अनुकूल लोकमत ऐकून अर्थातच मला आनंद झाला.

योग्य वेळीं मीं सांखळीला पोंचलों आणि लवकरच गोपाळरावांच्या घराकडे गेलों. उतावळ्या मनानंच मी गोपाळरावांच्या बैठ्या घरांत शिरलों. आंत मोठं अंगण होतं अन् चारी बाजूंना चौपेट होती. एका सोप्यावर बांबूच्या वेळांचा एक विस्तृत हांतरपाट पसरला असून त्याच्यावर सात-आठ इसम बसले होते. गोपाळरावांची मीं चौकशी केली. ते कोर्टांतून आजून परतले नव्हते. म्हणून, मी सोप्यावरच्या एका खुर्चीवर बसलों आणि त्या अनोळखी माणसांचं निरीक्षण करूं लागलों. त्या मंडळींत दोन-तीन गांवकरी होते, कांहीं भट होते, कांहीं कुळवाडी होते. त्यांच्याशीं झालेल्या थोड्याशा संभाषणावरून मला असं कळलं, कीं वेगवेगळ्या गांवचे ते इसम आपआपल्या सरकारी कामासाठीं आले असून गोपाळरावांच्याकडे ते उतरले आहेत.

थोड्या वेळानं गोपाळराव आले. त्यांच्याभोंवतीं लोकांचं कडंच पडलं होतं. मी दृष्टीस पडतांच, धावतच येऊन त्यांनीं मला आलिंगन

दिलं! पंधरा वर्षांपूर्वीच्या आठवणींनीं त्यांचं मन भरून आलं. त्यांनीं मला आपल्या खोलींत नेलं. आम्हीं पोषाक उतरला अन् बोलूं लागलों.

गोपाळरावांचं वय कांहीं जास्त नव्हतं. पंचेचाळीस वर्षांचं असेल-नसेल. पण चेहऱ्यावरील गांभीर्य खरोखरंच मोठं होतं. ते माझे स्नेही होते. तरी पण, त्यांच्या मुद्रेवरील भाव पाहून मला त्यांच्याबद्दल प्रेमापेक्षां आदरच जास्त वाटला. त्यांच्या डोळ्यांत सात्त्विकतेची व प्रेमळपणाची सौम्य चमक होती. इतर अवयवांच्या मानानं नाक जरा उंच होतं, गाल बसलेले होते, चेहऱ्यावर कोमल कारुण्य पसरलेलं होतं. पण तें कारुण्य म्हणजे दुःख नव्हे, आपत्तींनीं गांजून गेल्यामुळं चेहऱ्यावर उमटणारं दुःख वेगळं अन् सज्जनांच्या मुखावरील करुणेची छटा वेगळी.

मीं चहा घेतला. गोपाळरावांनीं आपलीं चारहि मुलं मला दाखवलीं. सगळ्यांच्या मुखावर तोच गोडवा व तीच सात्त्विकता! थोरला मुलगा बारा वर्षांचा होता.

आम्ही आधीं एकमेकांच्या संसारासंबंधीं बोललों. कांहीं वर्षांनंतर ही आमची पहिलीच भेट होती त्यामुळं संभाषण करायला मिळेल तेवढा वेळ थोडाच होता.

रात्र झाली. चौसोपीवर लामणदिवे पेटवण्यांत आले. खोलींत त्यांची पत्नी आली. तिनं समई पेटवली, दोन उदबत्त्या लावल्या व ती निघून गेली.

जेवणाची वेळ झाली अन् आम्ही हातपाय धुण्याकरितां उठलों. चौसोपीवर आलों, तों सोप्यावर बसलेली सात-आठ मंडळी जेवायला जाण्याच्या तयारीनंच उभी असलेली दिसली. मीं मनाशीं आश्चर्य केलं हे इतके लोक यांच्याकडे जेवायला कां राहतात हा मला प्रश्न पडला.

आम्ही जेवायला बसलों. घरचीं अन् परकीं मिळून पंधरा-सोळा माणसं होतीं. गोपाळरावांची पत्नी वाढायला आली. अंगाखांद्यावर सोन्याचे दागिने दिसले नाहींत. लंकेची गौरीच जणूं! पण चेहऱ्यावरील आनंद असीम होता. आंतरिक सद्भावनांचं तेज तिथं ओसंडत होतं. हास्यमुखानंच तिनं सगळ्यांना वाढलं. कांहीं स्त्रिया अशा भाग्यशाली असतात, कीं त्यांच्या दर्शनानंच आपल्या आत्म्याची तृप्ति होते, आपल्या अंतरंगाचा विकास झाल्यासारखं वाटतं.

जेवण झालं. दुसऱ्या एका खोलींत माझ्या निजण्याची सोय करण्यांत आली. माझ्याशेजारींच गोपाळरावांनीं आपलं अंथरूण घातलं. कोपऱ्यांतली समई संथपणें जळत होती.

"हे सगळे पाहुणे आजच उतरले आहेत तुमच्याकडे कीं..." मीं विचारलं.

"हें तर नेहमींचं चाललेलं आहे. दुपारच्या वेळीं जेवायला लोक अधिक असतात." गोपाळरावांनीं उत्तर केलं.

"मग तुमचं हें 'साम्राज्य' कसं काय चालतं?" मीं प्रश्न केला.

हा प्रश्न ऐकतांच गोपाळराव अधिकच गंभीर झाले आणि त्यांच्या नेत्रांत प्रेमळ कारुण्याची छटा चमकूं लागली. ते शांतपणानं म्हणाले, "आमचा संसार कसा चालतों, तें परमेश्वरालाच माहीत! संसार माझा आहे असं नाहीं मी समजत. संसार लोकांसाठीं आहे. देवाची इच्छा म्हणून मी त्यांची सेवा करीत आहे. त्यालाच या संसाराची काळजी."

ते थोडा वेळ थांबले. तोंडानं कांहीं गुणगुणत त्यांनीं हात जोडले आणि नंतर म्हटलं, "माझ्या अजोबांच्या वेळीं आमचं घराणं श्रीमंत होतं. लोकांना निरनिराळ्या रूपानं अन्नदान करणं हें आपलं कर्तव्य आहे, असं ते समजत होते. ओळख असो नसो, दोन प्रहरच्या वेळीं

कुणीहि घरांत यावं अन् जेवून जावं, असा प्रघातच पडला. कितीहि इसम जेवायला आले म्हणून कुणालाहि दुखत नसे. आपली श्रीमंती तेवढ्या-साठींच आहे, अशी घरच्या माणसांची समजूत होती. आपल्या पैशाचा व्यय कोणत्या ना कोणत्या रूपानं, अडल्या नाडलेल्यांच्या सुखाकडे व्हावा अशी त्यांना तळमळ लागली होती. एकदां असं झालं कीं, कुठच्या तरी खेड्यांतील एक कुळवाडी आपल्या सात वर्षांच्या पोराला घेऊन इथं आला. बिचारा दारिद्र्यानं गांजला होता. त्यानं दोन झाडू आणले होते. ते विकण्याच्या निमित्तानं तो घरांत आला. त्याची काया पाहून आजोबांना वाईट वाटलं. कारभाऱ्यानं झाडू विकत घेतले. कुळवाड्यानं पैसे मागितले नाहींत अन् कारभाऱ्यानं ते त्याला दिले नाहींत. तो अन् त्याचा पोरगा जेवायला राहिले. एक दिवस लोटला; दोन दिवस लोटले. तो नियमितपणें जेवणाच्या वेळीं हजर होई अन् पोटभर जेवून घेई! ही गोष्ट आजोबांच्या लक्षांत होतीच. सतत तीन महिने याप्रमाणं गेले! निश्चितपणें जेवणाची सोय झाल्यामुळं ते दोघेहि अंगानं भरले! आपल्या गांवाला जायची त्याला इच्छा झाली, तेव्हां तो पैसे मागायला आजोबांकडे आला. त्याच्याकडे पाहून ते हसतच म्हणाले 'आतां फिरून केव्हां झाडू घेऊन येणार आहेस?' आणि इतकं सांगून त्यांनीं त्याला पैसे, एक धोतर व आपला जुना अंगरखा दिला.

त्या वेळीं इथं खानावळ नव्हती. किती तरी लोक आपआपल्या कामासाठीं इथं येत. त्यांपैकीं बहुतेक, आमच्याकडे उतरत. त्याशिवाय कुठं देऊळ किंवा धर्मशाळा बांधायची असली किंवा शाळा स्थापना करावयाची असली तर त्या त्या कार्याला आमची वर्गणी नेमानं मिळे.

'आजोबा वारले' तेव्हां वडील लहान होते. त्यामुळं सगळा कारभार

दुसऱ्याच्या हातीं गेला. त्यानं घराण्याची वाताहत केली. सगळं उत्पन्न संपुष्टांत आणलं.

घरची इस्टेट अशा रीतीनं नष्ट झाली. त्यामुळं वडील वयांत येऊन त्यांनीं कारभार हातीं घेतला, तेव्हां त्यांची स्थिति विचित्र झाली. व्यवहारांतील नवखेपणा आणि घराण्याची परंपरा चालविण्याची जबाबदारी, या गोष्टीमुळं सुरुवातीला त्यांना किती कष्ट झाले असतील, त्याची कल्पना करा. वैभव मावळलं होतं खरं, पण दुपारच्या वेळीं अधिकारानं घरांत शिरणारे लोक मात्र कायमच होते. बरं, जेवायला येणाऱ्यांना परत लावणं म्हणजे मरण अशी समजूत. अशा स्थितींत वडिलांनीं केवढ्या चिंतेंत दिवस काढले असतील तें पहा. मुलंबाळं अन् बायको एवढाच आपला संसार असं मानून ते चालले असते तर घरचं उत्पन्न संसाराला पुरलं असतं; पण तसं केल्यास त्यांना समाधान केव्हांच लाभलं नसतं. लोक जेवून उठलेले पाहिले म्हणजे त्यांचं मन केवढ्या आनंदानं भरून येई ! एका गोष्टीची मला पक्की आठवण आहे !

एकदां पाहुण्यांची वाट पाहून झाल्यानंतर आम्ही घरची मंडळी पाटावर येऊन बसलों; इतक्यांत बाहेर कांहीं इसम आल्याचं कळलं. वडिलांनीं खूण केली. आम्ही पानावरून उठलों ! पाहुणे वाढलेल्या पानावर बसले अन् जेवण झालं. घरांत तांदुळ नव्हते. वडलांनीं खटपट करून तांदुळाची व्यवस्था केल्यानंतर, दोन-तीन तासांनीं आम्ही जेवलों. पूर्वजांच्या पुण्याईनं वडलांना लवकरच मामलेदार कचेरींत चांगली नोकरी मिळाली, आणि पूर्वजांनीं सुरू केलेल्या थोर परंपरेला कमीपणा न आणतां, त्यांनीं संसार केला. लोकांच्या पुण्यानंच आपणाला नोकरी मिळाली, असं त्यांना शेवटपर्यंत वाटे.

अशा वातावरणांत मी वाढलों. वडलांनीं मला शिक्षण दिलं अन्

मी वकील झालों. त्यांना शिक्षण नव्हतं; तरीहि त्यांनीं घराण्याचा लौकिक कायम ठेवला. मग मी मागं पाऊल कसं घेऊं? अन् तसं पाहिलं तर कुटुंबसंस्था ही समाजाच्या कल्याणासाठीं स्थापन झालेली एक धार्मिक संस्था नाहीं काय? मी वकिली चालवतों, पण माझं उत्पन्न काय आहे, अन् हा व्याप कसा चालतो आहे, हें मला कळत नाहीं! वडलांनीं--पूर्वजांनीं जोडलेल्या पुण्याईवरच माझा संसार सुखा-समाधानानं चालला आहे असं मला वाटतं. माझ्याकडे श्रीमंत कुळं बहुतकरून येत नाहींत. गरीब लोक हीं माझीं ठराविक कुळं! म्हणून तर मला सगळीकडे Advogado dos pobris (गरीबांचा वकील) असं तुच्छतेचं नांव श्रीमंतांनीं अन् त्यांच्या वकिलांनीं दिलं आहे! माझ्या फीचा हिशोब मी कधीं ठेवीत नाहीं. माझ्या कामाचे पैसे मेजावर ठेवले तर घ्यायचे. नाहीं तर नाहीं! लोकांकरतां, अडलेल्यां-करतां जगायचं नाहीं तर तें जीवित कसलं?

एक दिवस जेवायला कोणी नसलं तर मला जेवण चालत नाहीं. अन् मनाला कसली तरी रुखरुख लागून राहते! लोकांना रांधून वाढण्याची माझ्या बायकोला एवढी सवय झाली आहे कीं, जितके अधिक इसम जेवायला असतात, तितकी अधिक उत्साहानं ती काम करते! तिला स्वतःच्या अशा आवडीच राहिलेल्या नाहींत! हा संसार सुरळीतपणं, अब्रूनं, लौकिकानं कसा चालेल एवढीच तिला विवंचना! तिचा हा आनंद अन् येणाऱ्या-जाणाऱ्यांचं समाधान हें पाहून मी जगत आहे! हीच माझी संपत्ति! मला दुसरी कोणतीच महत्त्वाकांक्षा नाहीं. पूर्वजांच्या पुण्याईनं ही परंपरा अशीच चालली म्हणजे मिळवली!

बाकी खरी गोष्ट अशी आहे कीं, त्याग हा गुप्त असला, त्याच्या-पासून प्रत्यक्ष फायदा कोणताच होण्यासारखा नसला तरी त्याचे

परिणाम मात्र फार दूरवर जाणारे आहेत, अन् ते चिरकालिक आहेत. त्यागाचं, सेवेचं मोल गणिती पद्धतीनं करून चालणार नाहीं. गेल्या वर्षी मी दोन महिने तापानं आजारी पडलों, पण चुलीवर थाळी चढण्याचं कधीं बंद झालं नाहीं; अन् दहा-पंधराजणांची पंगत बसल्या-शिवाय राहिली नाहीं! आजारी असल्यामुळं माझी प्राप्ति बंद झाली होती. पण लोकांच्या कृपेला खंड कुठं पडला होता? आम्हांला न कळत घरांत तांदळाचे गोण येत होते; दाणागोटा येत होता. हें सारं कोण पाठवीत होतं, तें कांहीं कळत नव्हतं! सामान आणून टाकणाऱ्या हेलकऱ्याला विचारलं, तर तो नुसता हसे, अन् उपकार-कर्त्याचं नांव सांगायचं टाळी. मी बरा होऊन कामावर जाऊं लागलों, तेव्हां या प्रकाराला खंड पडला. कुणाचं हें भाग्य? ही आमच्या घराण्याची पुण्याई! माझ्या खिशांत कधीं पैसे असतात, कधीं नसतात; पण त्याची मला आतां पर्वा नसते. कारण, माझ्या संसारांतील अडचणी आपोआप निवारल्या जातात.

गोपाळराव थांबले. त्यांचं बोलणं ऐकून मी गहिंवरून गेलों! आमच्या संसाराचं आणि राजवाड्यांतील त्या भिकाऱ्याचं चित्र माझ्या डोळ्यांपुढं उभं राहिलं! कसले आमचे भिकारडे, किळसवाणे संसार!

दोन दिवस गोपाळरावांच्या गोड व उदात्त संगतींत राहून मी घरीं परतलों.

* * *

बरोबर एक वर्षानंतर, गोपाळराव अत्यवस्थ असल्याचं मला कळलं. मी लवकरच तिथं निघून गेलों. सोबत चार-पांचशें रुपयांची गाठ घेतली.

मी पोंचलों तेव्हां त्यांचं दुखणं हाताबाहेर गेलं होतं! घर लोकांनीं भरून गेलं होतं. प्रत्येकाच्या तोंडावर भयाण छाया पसरली होती.

मी आंत गेलों. डॉक्टर हताश होऊन गेले होते. गोपाळरावांना शुद्धि नव्हती. त्यांच्या बिछान्याभोंवतीं लोकांची दाटी झाली होती. लोक येत, त्यांच्यावर नजर टाकीत, दोन अश्रु ढाळीत, आणि त्यांना नमस्कार करून जड अंतःकरणानं परत जात.

दोन दिवस ते या स्थितींत होते. तिसऱ्या दिवशीं ते वारले. त्यांचं शव बाहेर काढलं तेव्हां, त्यांच्या उशाखालीं, अज्ञात हातांनीं ठेवलेल्या अडीच हजार रुपयांच्या नोटा आढळल्या! मीं आणलेली फुलाची पाकळीहि तिथं टाकली होती.

त्या दिवशीं 'मतग्राम' तालुक्यांतील लोकांना आपल्या गांवचं एकादं प्रेमाचं माणूस वारल्याप्रमाणं वाटलं, अन् बायकापोरांनीं देखील अश्रु ढाळले! बाजार आपोआप बंद झाले अन् लोकांनीं अन्न घेतलं नाहीं! लोकांच्या अंतःकरणांत तो भाग्यवन्त कायमचा कोरला गेला!

---

# ढासळलेले बुरूज

बऱ्याच दिवसांनंतर मी आजोळीं गेलों होतों. माझे आजोबा म्हणजे सत्तर वर्षांचें जुनें खोड. तीन पिढ्यांचें आयुष्य त्यांच्या नजरेसमोर होतें. त्यामुळें जुन्यानव्या गोष्टी, जुनेनवे आचारविचार जुनींनवीं माणसें, यांसंबंधीं त्यांचें मत अधिकृत मानण्यासारखें होतें. त्यांच्या संभाषणांत दोषच शोधावयाचा, तर तो असा होता, कीं कोणत्याहि गोष्टीचें निमित्त घेऊन ते जुन्यानव्याची तुलना करीत; व जुन्याचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करूं पाहत. हें करतांना, नेहमीं जुन्या जमान्यांतील उदात्त, उत्कृष्ट असें जें कांहीं त्यांना ज्ञात होतें, किंवा त्यांनीं प्रत्यक्ष अनुभवलेलें किंवा पाहिलेलें होतें, त्याचेंच ते मोठया तन्मयतेनें समरसतेनें वर्णन करीत. आणि, त्या त्या काळाशीं समरस होत असल्यामुळें त्यांची वाणी भावनेच्या भरानें रसरसूं लागे; त्यांच्या कथांतील रसाला अनुरूप अशीच त्यांची मुद्रा व त्यांचा अभिनय होई; आणि त्यामुळें त्यांच्या वर्णनाला किंवा कहाणीला विलक्षण रंग चढे.

त्या दिवशींहि असेंच झालें. आजोबांच्या तोंडून एखादी सुन्दर गोष्ट काढायची तर कोणती युक्ति योजावी, हें मला चांगलें माहीत होतें. संभाषणाच्या अनुरोधानें मी म्हणालों, " आजोबा, शिक्षणाच्या परिणामामुळं सध्यांच्या पिढींत पूर्वीपेक्षां जास्त सौजन्य शिरलं आहे, यांत शंका नाहीं ! "

आजोबांना कुठें तरी दुखल्यासारखें झालें. अशा वेळीं ते आपलें स्मृतिभांडार चाळून पाहत, व त्यांतून कांहीं मोलाचीं रत्नें काढून माझ्यापुढें धरून जणूं काय मला म्हणत, " बाबा रे ! कशाला उगीच घमेंड मारतोस ? हीं पाहिलींस आमच्या वेळचीं माणसं ? असलीं माणसं दिसतात का तुला सध्यां ? यानं हजारों रुपये मिळविले, त्यानं शेंकडों हवेल्या उठवल्या, हा गव्हर्नरकडे बोलतो, तो प्रख्यात डॉक्टर होऊन खोऱ्यांनीं पैसा ओढतो, एवढंच ऐकायचं ना आतां ? या वैभवांत, लखलखाटांत, मिरवणुकींत खरी माणुसकी दिसते आहे का तुला थोडी तरी ? आपला सगळा अभिमान, सगळा मोठेपणा विसरून जाऊन, ज्याच्यापुढं साष्टांग लोटांगण घालावं, अन् मनसोक्त प्रेमाश्रु गाळावे असा पुरुष दिसतो आहे का तुला एखादा सध्यांच्या काळांत ? नाहीं तर पूर्वीच्या काळीं ? समाजाचा मोठेपणा हा शिक्षणानं मोजायचा कीं समाजांतील व्यक्तींच्या त्यागशीलतेवरून ठरवायचा ? "

आजोबा थोडा वेळ थांबले. त्यांची दृष्टि कुठं तरी केंद्रित झाली. मला समजून चुकलें कीं, जुन्या थोर व्यक्तींच्या जीवनांचा चित्रपट त्यांच्या स्मृतीवरून सरकत आहे. मीं बाहेर पाहिलें. नदीच्या पलीकडे असलेल्या डोंगरावर किल्ल्याच्या तटाचे ढासळलेले बुरूज दिसत होते. तिन्हीसांजचा उदासीन काळोख पसरूं लागला होता. पैलतीरीं कांहीं

अजस्त्र फत्तेमारीचे सांगाडे रेतींत रुतून बसलेले होते. काळोखांतून, किनाऱ्यावर इकडे तिकडे अविच्छिन्नपणें फुटणाऱ्या लहान लहान लाटा दिसत होत्या. आणि माडांच्या अंधारांत लहान लहान घरें, कोंबडीच्या कुशींत लपलेल्या पिलांप्रमाणें लुकलुकत होतीं.

आत्मकेंद्रित केलेली दृष्टि आजोबांनीं आतां माझ्यावर लावली. गुडगुडीचे चार झुरके मारून, खोकत खोकत त्यांनीं गोष्ट सांगण्यास सुरुवात केली—

'पन्नास वर्षे झाली या हकीगतीला. मी त्या वेळीं वीस-पंचवीस वर्षांचा असेन नसेन. त्या प्रसंगाची आठवण झाली, म्हणजे काय वाटतं अन् काय नाहीं, तें तुम्हांला कळणार नाहीं.

××चे लाडूबाब लावणनीस हे मोठे सज्जन होते. एके काळीं त्यांच्या घरीं लक्ष्मी राबत होती. त्यांनीं केलेले उपकार अजूनहि आस-पासचे लोक विसरलेले नाहींत. त्या पंचक्रोशींत कोणी रडेल अन् त्याचे अश्रु पुसले गेले नाहींत असं कधींच झालं नाहीं. परमेश्वरच ज्याच्यावर कोपला त्याची गोष्ट निराळी. पण गरिबी, रोग इत्यादि संकटांमुळं कोणी हैराण झाला; अन् लाडूबाबांना ही हकीगत कळली, तर त्याच्या पाठीवर मायेचा हात ओढून त्याला धीर द्यायला अन् त्याचा शक्यतों पाठपुरावा करायला ते कधींच विसरले नाहींत.

अशा या महात्म्यावर गरिबीचा काळ ओढवला. औदार्य अन् साधेपणा, दयाळूपणा अन् सचोटी याचा फायदा घेऊन दुष्ट गबर झाले, अन् लाडूबाबांच्या सगळ्या जमिनी हळूहळू इतरांच्या ताब्यांत गेल्या. एवढा मोठा इनामदार पण दिवस मोठे कठीण आले. पण रक्त श्रीमंतीचं, कुलीनपणाचं! शौर्य गाजवून पूर्वजांनीं संपत्ति

मिळवलेली ! त्या पिढीजात संपत्तीनं अलौकिक गुण निर्माण केले खरे ! पण त्याच गुणांमुळं कुटुंबाचा ऐहिक उत्कर्ष संपुष्टांत आला !

'पण लाडूबाबांनीं आपली गरीबी लोकांना सांगितली नाहीं; किंवा ज्यांना त्यांनीं ऋणी करून ठेवलं होतं, त्यांच्याकडून मदतीची अपेक्षा-हि केली नाहीं. इतकंच नव्हे, तर एखाद्या सज्जनानं त्यांना साहाय्य देऊं केलं तर तें दि.खेल त्यांनीं स्वीकारलं नाहीं. रक्ताच्या थेंबागणिक मोठेपणा अगदीं सळसळत होता त्यांच्या अंगांत ! सर्वस्व गेलं पण स्वाभिमान सोडला नाहीं ! जुन्या वाडयावर दैन्याची सावली पडली ! घरांत नवीं वस्त्रं, नवं सामान येण्याचं बंद झालं, व जुनं टाकाऊ म्हणून सोडलेलं, वापरण्यांत येऊं लागलं. दागिने गेले, जमिनी गेल्या ! वाडा व माणसं यांचा मोठेपणाच काय तो शिल्लक राहिला !

पण थोड्याच काळांत हा मोठेपणा देखील थट्टेचा विषय झाला. गरीबीपेक्षां ही गोष्ट त्यांना अधिक जाचक झाली. श्रीमंतीच्या वैभवाचीं, मानसन्मानाचीं प्रतीकं मानल्या जाणाऱ्या गोष्टी सर्वसाधारण लोकांच्या दृष्टीनं हास्यास्पद ठरल्या. ही जाचणी—तीव्र, सतत जाचणी—त्या खंबीर पुरुषास सोसवली नाहीं. त्यांची ती निर्भय, ताठ मूर्ति अगदीं त्रासली गेली, शोषली गेली. अतिशय मोठी व्यक्तिमत्ता, पण तिला राहायला जागा नाहीं असं झालं. मुलंबाळं होतीं, पण काय करणार ! खानदानींत वाढलेल्या पुरुषाला वाईट काल आला म्हणजे त्याची स्थिति मोठी अनुकंपनीय होते. पोटासाठीं कोणता पेशा पत्करणार ? हातांत कुदळ घेऊन रोजगाराला जाणार ? चार पैसे उसनवार घेऊन दुकान लावणार ? करणार काय ! वाड्याच्या अजस्र भिंतींकडे पाहत, सगळीं दुःखं गिळायचीं व शिल्लक राहिलेल्या अपुऱ्या उत्पन्नां-

तून, उपासतापास काढीत, सगळ्या गरजा मारीत खर्च भागवायचा याशिवाय गत्यंतर नव्हतं.

पण या सज्जनालाहि एक शत्रु होता. त्याच्याच रक्तावर तो पोसला, पण त्यालाच तो घातक ठरला. त्यांच्याकडे तो कारभारी म्हणून राहिला. त्याचं नांव खळू कामत. नोकर म्हणून घरांत शिरला अन् थोड्याच वर्षांनीं घरच्या इस्टेटीचा मालक बनला. लाडूबाबांच्या अपमानाचा प्रसंग त्यानं कधीं दवडला नाहीं. हळूहळू तो बराच गबर झाला. कायदे-कज्जाचा आश्रय घेऊन त्यानं साध्या-भोळ्या लोकांच्या जमिनी घशांत घातल्या. फिरंगी भाषा व कायदा यांचं ज्ञान व पैसे यांच्या बळावर त्याला सरकार-दरबारांत देखील मान मिळूं लागला. लोकांनीं शेतसारा न भरल्यामुळं जमिनी लिलावांत जाव्यात व त्या खळू कामतीनं थोडक्यांत आणाव्या! त्यामुळं थोड्याच वर्षांत सगळ्या तालुक्यांत खळू तेवढा श्रीमंत व बाकीचे सारे गरीब होत जाऊं लागले.

त्या दिवशीं लाडूबाब कांहीं कामाकरितां पणजीला गेले होते. पिंपळाचा अजस्त्र निष्पर्ण वृक्ष पाहवतो का कुणाला? त्याचप्रमाणं ते दिसत होते. देहाची काठी वांकून पाठीला पोक आलेलं, हातांत भला मोठा दांडा, वार्धक्य व गरीबी यामुळं मुद्रेवर अवकळा पसरलेली, डोक्याला भरजरी मंदील, अंगांत जीर्ण बाराबंदी, पायांत फाटक्या वहाणा. जुनं होतं तें वैभवनिदर्शक व नवं आलं तें दैन्यदर्शक; त्यामुळं त्यांची मूर्ति अन् त्यांचा वेष लोकांच्या थट्टेचा, हास्याचा विषय झाला असल्यास नवल नाहीं.

ते आपल्या विचारांतच कष्टानं पावलं टाकीत चालले होते. पण त्यांची नजर किती प्रशान्त, किती समाधानपूर्ण! जणूं आशीर्वादांचे स्रोतच त्यांतून निघून पाहणाऱ्याला कुरवाळीत!

अशी त्यांची स्वारी चालत असतांना त्यांना कुणी तरी हाक मारली, " काय लाडूबाबा ! "

लाडूबाबा वाटेवरच थबकले. त्यांनीं डोळ्यांपुढं धरलेली छत्री जरा दूर केली व मान वर करून बाजूला पाहिलं; आणि जवळच्या घराच्या व्हरांड्यांत एका बाकावर बसलेली रवळू कामतीची कुटिल मूर्ति दिसतांच, त्यांच्या सर्वांगांतून तिटकाऱ्याची, त्वेषाची एक चमक निघून गेली. त्यांनीं आपल्या सौजन्याला अनुसरून म्हटलं, " काय रवळू, खुशाल आहेस ना ? "

" खाशे, आज इकडे कुणीकडे ? अन् तुम्ही पायीं येतां, हें शोभतं का तुम्हांला ? माचील, पालखी ही तुमची वडिलोपार्जित मिरास ! दिवसा दोन वातींचा कंदील बरोबर घेऊन तुम्हीं फिरणार ! हा सगळा व्याप तुम्हीं सोडला तर कसं होईल ? "

या भाषणांतील उपरोधाचा दर्प त्या म्हाताऱ्याला असह्य झाला. आणि हें बोलणारा तरी कोण ? तर आपलाच कारभारी ! पण त्याचं पारिपत्य करण्याचं साधन त्यांच्या हातांत कुठं होतं ? त्यांनीं सगळा राग गिळून म्हटलं, " देवाच्या मर्जीप्रमाणं सगळं कांहीं होतं ! आपण काय करतों ! "

" इकडे कुणीकडे आलां होतां ? सरकारी खाजन ( ठिकाण ) पंधरा हजारांच्या मूळ रकमेनं आज कोर्टांत लिलावांत जाणार आहे, तें विकत घेण्याची इच्छा तर नाहीं ना तुमची ? इनामदार तुम्ही ! तुम्ही कांहींहि करूं शकाल ! " आणि हे विषारी उद्गार काढून तो खदखदां हसला.

अशी एक गोष्ट सांगतात, कीं मरणाच्या दारांत पोंचलेल्या एका म्हाताऱ्या सिंहाला अगदीं क्षुल्लक जनावरंसुद्धां येऊन त्रास देऊं लागलीं;

पण त्याची शांति ढळली नाहीं. परंतु ज्या वेळीं चारहि खुरांवर दौडत एक गाढव त्याच्यापाशीं येऊं लागला, त्या वेळीं त्याला पाहून सिंहानं एक हृदयद्रावक आरोळी ठोकून परमेश्वरापाशीं मरणाची याचना केली.

लाडूबाबांचीहि तीच गत झाली. त्यांना वाटलं, ह्या हलकटाचे हे शब्द ऐकायला आपण कां जगलों! त्याच क्षणीं मरण आलं असतं तर किती बरं झालं असतं! दैवानं आपली काय दुर्दशा केली ही! पंधरा हजार रुपये! पंधरा रुपये तरी आहेत का आपल्या शिलकेंत? रवळूनं माझा असा अपमान करावा!

या विचारांनीं त्यांना अगदीं भडभडून आलं. त्यांचे डोळे भरून आले. त्यांनीं मान वर केली, नजर आकाशाकडे लाविली, आणि रवळू कामतीकडे वळून म्हटलं, "परमेश्वराची इच्छा असली तर खाजनाची जमीन मीच आणीन." आणि हे शब्द ताणलेल्या मनोवृत्तींत उच्चारून त्यांनीं पाऊल पुढं टाकलं.

त्यांच्या अवमानीत व्यक्तित्वानं त्वेषानं हें उत्तर दिलं खरं, परंतु प्रत्यक्षाचं भेसूर स्वरूप नजरेसमोर येतांच त्यांची अजित वृत्ति लोपली. त्यांना वाटलं, आपण किती असहाय आहों! या वेळीं आपले शब्द खरे व्हायला प्रत्यक्ष परमेश्वर खालीं उतरला पाहिजे! आपली सत्कृत्यं कुठं गेलीं? आपल्या वर्तनाला काय फळ आलं! अरेरे! किती लाचारी आली आपल्याला ही! आपल्याला कांहीं घटकांपुरता पंधरा हजार रुपये देणारा महात्मा या वेळीं कुणीच नसेल का?

आणि या विचाराबरोबर त्यांच्या स्मृतीवरून त्या वेळचे ठळक पुरुष निघून गेले; आणि पुरुषोत्तमबाब कॆंकऱ्याची धीरगंभीर, उदात्त मूर्ति त्यांच्या नजरेपुढं स्थिर झाली.

पुरुषोत्तमबाबांची आठवण होतांच लाडूबाब वाटेवर थांबले.

त्यांनीं हात जोडून मनांत म्हटलं "मंगेशा, आतां तुझाच काय तो मला आधार!"

आणि ही प्रार्थना चालली असतांना पांढऱ्या सफेत घोड्यांची एक टुमदार गाडी त्यांच्या नजीक पोंचली व थांबली दिखील!

"अहो लाडूबाब, कुठं चाललांत?" गाडींतून शब्द आले.

लाडूबाबांनीं आश्चर्यचकित होऊन वर पाहिलं, आणि पुरुषोत्तम-बाबांची तेजःपुंज मूर्ति नजरेला पडतांच त्यांनीं सद्गदित होऊन म्हटलं,

"पुरुषोत्तमबाब!"

पुरुषोत्तमबाब गाडींतून झटकन् खालीं उतरले. त्यांनीं लाडूबाबचे दोन्ही हात पकडून त्यांना गाडींत उजव्या बाजूला बसवीत म्हटलं,

"लाडूबाब! काय ही तुमची स्थिति! कुठं चाललांत तुम्ही?"

पुरुषोत्तमबाबांचें अंतःकरण गहिंवरून आलें. लाडूबाब म्हणजे केवढा थोर माणूस! मनानं थोर तसा संपत्तीनंहि! त्याच्यावर ही दशा! दोघेहि एका काळचे स्नेही. पुरुषोत्तमबाबांनीं मान खालीं घातली. त्यांना वाटलें लाडूबाबांना आपण कुठला प्रश्न विचारला! लाडूबाबांनीं म्हटलं, "पुरुषोत्तमबाब! देवाची कृपा म्हणून या अवस्थेंत दिखील मला तुमची भेट झाली! आतां पूर्वीचे दिवस कुठं आहेत? आतां फक्त देवाच्या हाकेची वाट पाहत बसायचं!"

"तुम्ही इतक्या वर्षांनीं मला भेटत आहांत? आतां तुमची सारी हकीकत मला सांगा पाहूं. आमच्या या व्यापांत तुमच्यासारख्या सज्जनांची चौकशी करायला दिखील आम्हांला वेळ मिळूं नये, हें आमचं दुर्दैव नाहीं का? तुमची स्थिति पूर्वीसारखी नाहीं हें मीं ऐकलं होतं! पण या थराला—" थोडा वेळ दोघेहि स्तब्ध राहिले.

गाडी जोरानं चालत होती. रस्त्यांतून लोकांची वर्दळ चालली

होती. पण त्या गडबडींत देखील घोड्यांच्या टापांचा स्पष्ट आवाज केवढ्या मोठ्यानं तरी ऐकूं येत होता !

लाडूबाबांनीं आपल्या आपत्काळाचा इतिहास थोडक्यांत सांगितला; पण आतां घडलेली हकीगत त्यांनीं सांगितली नाहीं. तसं करणं त्यांच्या जिवावर आलं. पंधरा हजारांची याचना पुरुषोत्तमबाबांपाशीं करावयाची ? छेः ! नकोच ! पण पुरुषोत्तमबाब म्हणजे किती मनकवडा !

लाडूबाबांचं तात्कालिक दुःख त्यांना कसं कळलं कुणाला माहीत ! त्यांनीं विचारलं, " लाडूबाब ! मीं तुम्हांला गाडींतून पाहिलं त्या वेळेस तुम्ही देवाची प्रार्थना करीत असलेले मला दिसलां; अन् तुमचा त्या वेळचा चेहरा मी विसरलों नाहीं. भयंकर संकटांत सापडल्या-प्रमाणं तुम्ही मला दिसलां. माझ्यापासून कांहींहि लपवून ठेवूं नका ! मी तुमचा धाकटा भाऊ असं समजा. पण 'काय घडलं तें मला मोकळ्या मनानं सांगा पाहूं ! मंगेश महारुद्राची शपथ आहे तुम्हांला ! "

" पुरुषोत्तमबाब, काय भलतंच हें ? माझीं दुःखं उघड करून तुम्हांला त्रासांत का घालूं मी ! तुमचे व्याप थोडे म्हणून ? पण तुमचा आग्रहच आहे, तेव्हां सांगतोंच..." आणि लाडूबाबा घडलेला प्रकार पुरुषोत्तमबाबाला साद्यंत सांगूं लागले.

गाडी आतां विस्तृत शेतांतून गेलेल्या रस्त्यावरून जाऊं लागली. अफाट पिवळीं शेतं, मधूनमधून नदीचे फाटे, मधून माडांच्या रांगा, अंतरा अंतरावर मिठाचे शुभ्र ढीग, मधेंच झाडी व झाडींतील लोक-वस्ती. हीं दृश्यं ओलांडीत गाडी चालूं लागली.

हकीकत सांगून झाल्यावर लाडूबाब गहिंवरून म्हणाले, " हेंच माझं संकट ! पुरुषोत्तमबाब, लोक तुम्हांला मंगेशाचा अवतार

समजतात! हा अवतार आज माझ्या हाकेला पावला आहे. मी रस्त्यावर प्रार्थना करतांना तुमची मूर्ति माझ्या मनांत आली होती!"

पुरुषोत्तमबाबांना भावनांचा वेग अनावर झाला. वाटेवरल्या गरीबाच्या इवल्याशा दुःखानं व्यथित होणारा पुरुष तो! लाडूबाबांचं मन त्याला कुठवर कळणार नाहीं? त्यांनीं लाडूबाबांना गाडींतच दोन्ही हातांनी जवळ करीत म्हटलं, "लाडूबाब! मंगेश समर्थ आहे, तुम्ही भिऊं नका! आतां आपण घरीं जाऊं. आज मला सोमवारचा उपवास आहे. तुम्ही जेवा; नंतर तुम्ही पणजीला चला. मी मंगेशला जाईन. तीन वाजतां कोर्टांत लिलाव आहे. तें झाल्यावर तुम्ही या गाडीनं मंगेशला या. आज नऊ वाजतां पालखी आहे."

लाडूबाब अगदीं गहिंवरून गेले. दोघेहि थोर! दोघांनींहि एकमेकांना ओळखलं! बाह्य मोठेपणा क्षुल्लक माणसांना; त्या महात्म्यांना त्याचं काय? म्हणूनच पुरुषोत्तमबाबांना पाहून लाडूबाबांना एकदम कळवळा आला.

वाटेंत एक मोठा बंगला लागला. पुरुषोत्तमबाबांनीं गाडीवानाला म्हटलं, "गाडी कंपाउंडांत घे."

पहारेकऱ्यांनीं गाडी पाहून सलाम ठोकला व गाडी आंत सोडली. गाडी दरवाजापाशीं थांबली. "सांतुबाब, जरा थांबा हं. मी जरा गव्हर्नरना भेटून येतों." एवढं बोलून पुरुषोत्तमबाब गाडींतून खालीं उतरले. त्याबरोबर दोन शिपाई धावतच तिथं येऊन त्यांना आंत घेऊन गेले.

पंधरा-वीस मिनिटांतच पुरुषोत्तमबाब बाहेर येऊन गाडींत बसले, व त्यांनीं म्हटलं, "आतां थेट कालापूरला गाडी घे."

थोड्याच वेळांत गाडी कालापूरला पुरुषोत्तमबाबांच्या बंगल्यासमोर

थांबली. दोघेहि उतरले. पुरुषोत्तमबाबांनीं लाडूबाबांना किती सन्मानानं, आपलेपणानं वागवलं ! दोघांनींहि अंघोळ केली. मंगेशाच्या मूर्तीची पूजा केली. दोघेहि धार्मिक, श्रद्धाळू ! मंगेशावर दोघांचाहि सारा भरिभार !

पुरुषोत्तमबाबांनीं नंतर एक पत्र लिहून लाडूबाबकडे देत म्हटलं, " आतां तुम्ही पणजीला चला ! तिथं तीन वाजतां कोर्ट भरेल ! पण तुम्ही सव्वातीन वाजतां तिथं जा, व हें जज्जसाहेबांकडे पाठवून द्या. नंतरच्या गोष्टी मीं सांगितल्याप्रमाणं करा. तुम्ही मंगेशाला भेटल्या-नंतर मी फराळ करीन."

इतकं बोलून पुरुषोत्तमबाब 'माचिलां'तून मंगेशला गेले आणि लाडूबाब गाडींतून पणजीला जायला निघाले.

* * *

तीन वाजतां जाहीर केल्याप्रमाणं कोर्ट भरलं. जज्ज आले. इतर काम-दार गडबडीनं इकडे तिकडे फिरूं लागले. रवळू कामत तर केव्हांच येऊन बसला होता. त्याशिवाय इतर कांहीं इसम जमीन नेण्याच्या उद्देशानं आले होते, परंतु रवळू कामतीला पाहून, सगळेजण बाहेरच घुटमळूं लागले; कारण त्याच्याविरुद्ध जायची कुणाचीहि छाती नव्हती.

तीन वाजतांच जज्ज येऊन आपल्या स्थानीं विराजमान झाले. इतर कामगार मेजावर जाऊन बसले. पांचसहा मिनिटं गेलीं तरी न्यायाधीश तटस्थच ! ते कुणाची तरी वाट पाहत असावेसं दिसलं. रवळू कामत जमीन आणायला अगदीं अधीर झाले होते. जज्जसाहेब त्यांच्या ओळखीचे. रवळू कामतांनीं त्यांना विचारलं, " आतां विलंब कां करतां ? पुकारा करायला कांहीं हरकत आहे का ?"

जज्जसाहेबांनीं शांतपणानं म्हटलं, " अजून एक गृहस्थ यायचा

आहे. त्याच्या आगमनानं जमिनीला अधिक किंमत येऊन, सरकारचा फायदा होईल असं मला वाटत असल्यामुळं, मी आणखी थोडा वेळ थांबत आहे."

असे कोण गृहस्थ यायचे आहेत तें आम्हांला कळेल का? खंळू कामतीनं उत्सुकतेनं विचारलं.

इतक्यांत एका शिपायानं एक पत्र आणून न्यायाधिशांच्या हातीं दिलं. त्यांनीं तें पत्र फोडून वाचलं व त्याबरोबर ते घाईनं उठले. इतर लोकहि उठले. एवढ्या महत्त्वाची व्यक्ति कोण आली आहे हें कुणालाच कळेना.

न्यायाधीश बाहेर आले. त्यांनीं लाडूबाबांचं अत्यंत प्रेमानं स्वागत केलं; व त्यांना आंत आणून सन्मानपूर्वक, आपल्या उजव्या बाजूला एका खुर्चीवर वेगळ्याच जागीं बसवलं.

नंतर लोकांकडे वळून ते म्हणाले, " या लिलावांत लाडूबाबांसारखे जुने इनामदार भाग घेताहेत ही आनंदाची गोष्ट होय. आतां आपण कामाला सुरुवात करूं या."

कामदारानं जमिनीचं नांव मोठ्यानं उच्चारून पंधरा हजारांचा पुकारा केला.

खळू कामत काळाठिक्कर पडला. या आश्चर्यांचा उलगडा त्याला मुळींच होईना. लाडूबाबासारखा कफल्लक येतो काय, त्याचं स्वागत थाटानं करण्यांत येतं काय, सगळंच कोडें! कामतीला सकाळच्या आपल्या वर्तनाची आठवण झाली.

लाडूबाबांनीं पंधरा हजारांची रक्कम वीस हजारांवर नेऊन म्हटलं, " वीस हजारांना माझी मागणी!"

कामतींना कळून चुकलं, कीं आतां लिलावांत पडण्यांत अर्थ नाहीं. ते मान खालीं घालून गप्पच राहिले.

जज्ज म्हणाले, " खळू कामतीचा याच्यावर आंकडा नाहीं का?"

कामतीनं मानेनंच नकार दिला. जज्जांनीं जमीन लाडूबाबांनीं लिलावांत विकत घेतल्याचं जाहीर करून तसे कागद-पत्र केले.

कोर्ट उठलं. जज्जांनी लाडूबाबांचे आभार मानले.

लाडूबाबांना वाटलं, काय कल्पनातीत गोष्ट घडली ही ! पुरुषोत्तम-बाबांचे आपण कसे उतराई होऊं !

ते खालीं येऊन गाडींत बसले. पुरुषोत्तमबाबांचा उपकार त्यांच्या मनाला खुपला. ते रजिस्ट्रारकडे गेले आणि त्यानं लगेच दोन कागद तयार करून घेतले व तेव्हांच त्यांनीं समाधानाचा निःश्वास टाकला.

गाडी चालूं लागली. लाडूबाबांना आपली सगळी इनामदारी परत मिळाल्याचा आनंद झाला.

गाडी मंगेशीला देवळाच्या कमानीकडे पोंचली तेव्हां नऊ वाजले. गाडींतून उतरून लाडूबाब जवळ जवळ धावतच पुरुषोत्तमबाबकडे गेले. देवळाच्या दरवाजांत उभे राहून पुरुषोत्तमबाब अधीर मनानं लाडूबाबांची वाट पाहत होते. समाराधनेला अग्रशाळेंत हजारों लोक पंक्तीनं बसले असून पुरुषोत्तमबाबांची वाट पाहत होते. पुरुषोत्तम-बाबांनीं पंक्तींत उभें राहून पाणी सोडल्याशिवाय 'हरहर महादेव' पडून जेवायला सुरुवात होणार नव्हती.

पुरुषोत्तमबाबांची उभी भस्मचर्चित मूर्ति लाडूबाबांच्या नजरेला पडतांच आतांपर्यंत आवरून धरलेलं त्यांचं मन अगदीं विरघळून गेलं. एखाद्या लहान मुलाप्रमाणं ते धावतच पुरुषोत्तमबाबाकडे गेले आणि त्यांच्या पायांवर त्यांनीं घालून घेतलें; आणि " पुरुषोत्तमबाब, तुम्ही

मंगेशाचे अवतार! तुम्ही आज नसता तर या म्हाताऱ्याची अब्रू राहिली नसती. तुम्हीं माझा शब्द खरा केला!" असं म्हणून आपले अश्रु त्यांच्या पायांवर ओतले.

पुरुषोत्तमबाब या प्रकारामुळें गोंधळून गेले. ते म्हणाले, "हें काय लाडूबाब? उठा-उठा, तुम्हीं आम्हांला नमस्कार करायचा? आम्ही मंगेशाला नमस्कार करूं. चला—या देवळांत."

दोघेहि देवळांत गेले. दोघांनींहि साष्टांग दंडवत घातले. आसपासचे लोक आश्चर्यचकित होऊन त्यांच्याकडे टकमक पाहूं लागले.

"चला लाडूबाब, मंडळी आमच्यासाठीं तिष्ठत राहिली असतील; आधीं फराळ करूं व नंतर बोलत बसूं."

"नाहीं पुरुषोत्तमबाब, तुमचं धन तुमच्याकडे दिल्याशिवाय मला घास जाणार नाहीं."

"छे-छे! लाडूबाब, काय बोलतां हें तुम्ही? दिलेलं दान मी परत घेईन का? ती जमीन तुमची आहे! ती मला नको." असं म्हणत पुरुषोत्तमबाबांनीं लाडूबाबनीं पुढं केलला कागद दूर सारला.

"पुरुषोत्तमबाब, काय हा तुमचा मोठेपणा! पण मी तरी ही जमीन कशी घेऊं? लोक मला काय म्हणतील? माझं मनच मला काय म्हणेल? हें कळलंच तर माझीं पोरंबाळं अन्न दिखील घेणार नाहींत. तुम्ही ही जमीन स्वीकारणार नसाल तर माझा आग्रह नाहीं. पण मला एवढं तरी करूं द्या. ज्या मंगेशाच्या प्रेरणेनं मला तुमची आठवण झाली अन् तुम्हांला हें मोठं साहाय्य करण्याची प्रेरणा झाली, त्या मंगेश महारुद्रालाच या महापर्वणीच्या दिवशीं ही जमीन मला अर्पण करूं द्या."

असं म्हणत त्यांनीं आपल्या हातांतला दुसरा कागद मंगेशाच्या ताटांत टाकला.

पुरुषोत्तमबाबांनीं लाडूबाबांना आलिंगन दिलं. दोघेहि महात्मे! पृथ्वीच्या मोलाचे त्यांचे ते आनंदाश्रु पाहून, मंगेशाच्या मूर्तीनं देखील अश्रु ढाळले असतील!

—आणि त्या वेळेपासून ती अफाट, सुपीक जमीन, 'लावणनिसांचं खाजन' या नांवानं श्री मंगेशाच्या इस्टेटींत ओळखलं जातं.'

* * *

आजोबांची कहाणी संपली.

---

# गुरवाचें रक्त

बंदूक खांद्यावर टाकून सकाळीं सहा वाजतां घरून निघालों होतों. पारध म्हणजे मृगजल. पारधी पक्ष्यांच्या मागें लागला म्हणजे त्याला स्थलकालाची स्मृति राहत नाहीं व तो वेडावून जातो. कवड्यांच्या मागून एकसारखा रखरखीत उन्हांत डोंगरावरून फिरलों व जीव तहानेनें व्याकुळ झाला म्हणून खालीं पसरलेल्या दाट झाडीकडे उतरूं लागलों. पायथ्याशीं पोंचलों तेव्हां एक विस्तृत शेत दिसलें. त्याच्या एका बाजूस लहानशी नदी वाहत असून तिच्या तीरावरील चिखलांत बगळे फिरत होते व शेतांच्या मेरांवर बसून पांढऱ्या बळारी, पाऊलभर पाण्यांतील जीव, लांब टोचींनीं पकडीत होत्या. आनंदित होऊन मीं शेतांत उडी टाकली आणि ओणव्यानें खालीं मान घालून बळारींच्या दिशेनें चालूं लागलों. मी जवळ पोंचलों कीं ते शुभ्र पक्षी भुरकन उडत आणि आपले रुंद पंख सावकाश हालवीत व गळ्यांतून 'टक-टक'

असा आवाज काढीत थोड्याच अंतरावर जाऊन बसत. याप्रमाणें मी सारें शेत फिरलों पण बळारी जवळ येऊं देईनात. कंटाळा आला व दुरूनच दोन बार काढले पण ते फुकट गेले. आरशांतलें धन दिसावें पण मिळूं नये, तशी माझी स्थिति झाली. थोडा वेळ माडाच्या सावलींत बसून विसांवा घ्यावा म्हणून बांधावर चढलों व दोन तीन " कवडे " एक-दोन " बकी " व तीन-चार " कोकारी " मिळाल्या होत्या त्या जमिनीवर ठेवल्या व बंदूक माडाला टेकून ठेवून तेथेंच एका माडाच्या मुळाशीं बसलों. चारी बाजूंनीं पाणी पसरलें होतें. जरा पलीकडे पोकळीच्या कुळागारांत वाहणाऱ्या पाण्याचा सळसळाट ऐकूं येत होता. बांधाच्या कडेनें केवढा मोठा ओहोळ वाहत येऊन नदीला जाऊन मिळाला होता ! ओहोळाचें पाणी अगदीं स्वच्छ दिसलें, पण तें पितात कीं नाही हें विचारण्याकरितां मी आसपास तेथील माहीत-गार माणूस शोधूं लागलों. जवळच एका माडावर एक कुळवाडी पायांत सुंभाचें " खाणवें " घालून चढत होता. मीं त्याला विचारलें, " हें पाणी पितात का हो ? "

" आम्ही पितों. पण तुम्ही थकलेले दिसतां, तुम्ही तें पिऊं नका. तुम्हांला अडसर काढून देतों. या माडाचीं अडसरें फार गोड आणि मोठीं आहेत, बघा. " तो म्हातारा कुळवाडी म्हणाला.

आपल्या अडसरांची स्तुति करीतच तो माडावर चढला. मी नको म्हणत असतांना त्यानें दोन अडसरें खालीं टाकलीं. माडावरून झपाझप खालीं उतरून त्यानें तीं सोललीं व कोयत्यानें त्यांना लहानशीं भोंकें पाडलीं. मी एक अडसर तोंडाला लावून त्यांतलें सगळें पाणी पिऊन टाकलें व कोयत्यानें त्याचीं दोन अर्धें करून, सोडणाच्या एका दाट तुकड्यानें, आंतील पातळ, लिबलिबित कातली खरपून खाल्ली.

तेवढ्यानें माझें पोट भरलें. त्या म्हाताऱ्याचा उपकार फेडण्याकरितां मीं म्हटलें, "ही भाकर तुम्हांला घ्या. माझं पोट भरलं. मला गरज नाहीं त्याची."

"आज आम्ही गांवकरी अन्न खात नाहीं. दूध पिऊन किंवा फळें खाऊन राहतों."

म्हातारा कांबळ जमिनीवर टाकून बसला. तो आतां जी गोष्ट सांगणार आहे ती फार महत्त्वाची आहे असें त्याच्या चेहऱ्यावरून वाटलें. त्यानें माथ्याला बांधलेल्या मळकट व तेलकट फडक्यांतून कुड्याच्या पानाची मोठी विडी काढली. लहानशा पिशवींतून चकमक काढून माडाच्या भुशावर ठिणगी पाडली व विडीचे झुरके ओढीत म्हटलें, "हें इथं तुम्हांला जिकडे तिकडे पाणी दिसतं ना?"

"हो, इतकं विपुल पाणी मी इथंच पहिल्यांदा पाहत आहे."

"पण पन्नास वर्षांपूर्वी एक प्रसंग असा आला होता, कीं या सगळ्या गांवांत पाण्याचा एक थेंबहि नव्हता! अन् म्हणूनच आज आम्ही पोटांत अन्न घेत नाहीं."

"आज एखादं व्रत आहे वाटतं?" मीं आश्चर्यानें विचारलें.

"तसं नाहीं. पण आजच्या दिवशीं या गांवांत कुणीहि अन्न घेत नाहीं. तांदूळ पोटांत गेला, कीं कांहीं तरी आपत्ति घडून मनुष्य दगावतो."

मी आश्चर्यानें व उत्सुकतेनें त्याला विचारलें, "म्हणजे? असं कां घडतं इथं?"

मी अगदीं त्याच्याजवळ गेलें. त्याचा प्रत्येक शब्द मला किती तरी महत्त्वाचा वाटला. त्यानें पुढें म्हटलें, "मी त्या वेळीं पंधरा वर्षांचा असेन नसेन; मला मिसरूडदेखील फुटली नव्हती. दिपा राण्याचं बंड

नुकतंच होऊन गेलं होतं. आमचा हा गांव–सोनं पिकविणारा समृद्ध गांव–त्या पलीकडच्या कुळागारांत दरवर्षी दोनशें खंडी सुपारी पिकते आणि या शेतांत वीस कुंभ भात पिकतं; पण हें सगळं पाणी कुठून येतं ठाऊक आहे? त्या कुळागाराच्या टोकाशीं वेताळाचं एक देऊळ आहे. तिथं एक झरा आहे. त्याचं पाणी या सगळ्या पिकांना पुरून उरतं. आमचा वेताळ म्हणजे दैवत मोठं जागृत अन् कडक. गांवकऱ्यांच्या हाकेला तो पावला नाहीं असं कधीं घडलं नाहीं. सगळ्या गांवचा तो राखणदार. एकदां गांवकऱ्यांचा भ्रष्टाकार पाहून तो कोपला व माझ्या जांघेएवढा मोठा झरा त्या तळ्यांतून निघत होता तो थप्प पडला! दोन दिवसांच्या आंत सगळीं शेतं खडखडीत! पाट आटले! तलाव कोरडे झाले! तुम्हांला काय सांगू बाबा! देवाच्चाच कोप तो! दोन दिवसांत सगळा गांव दुसरा झाला. लोकांचा आनंद मावळला. दिवसामागून दिवस लोटले– पण पाणी नाहीं! मागणी केली, गाऱ्हाणीं घातलीं, सगळे गांवकरी जमून देवचाराला शरण गेले; पण पाण्याचा थेंब दिसेना! शेजारच्या गांवचं पाणी आणून लोक पिऊं लागले; पण हें शेत व तें कुळागार कसं पिकणार? पोफळीच्या मुळांत दिवसरात्र पाण्याचं शिंपणं नसलं तर तीं झाडं जिवंत कशीं राहतात? पोफळं सुकून झडूं लागलीं, व चुडितं बावलीं वायंगण बोटभर वाढलं होतं. पण पाणी आटल्याबरोबर तें वाळून गेलं. दूध नसलं म्हणजे तान्ह्या मुलाची जशी अवस्था होते तशी गांवची स्थिति झाली. सगळीकडे ओसाड. गांवावर मृत्यूची छाया पसरली! कुणालाच कांहीं सुचेना. खाऊनपिऊन सुखी असलेले लोक गांव सोडून रडत रडत बाहेर जाऊं लागले. या शेतांकडे पाहून मी कितीदां तरी रडलों आहे! कडेवर कळशा घेऊन गांवच्या बायकांनीं दीड

कोसावरून पिण्यासाठीं पाणी आणावं. अरिष्ट टळावं म्हणून आम्हीं किती उपाय केले म्हणून सांगू! घागरी भरून दुसऱ्या गांवचं पाणी आणून वेताळाला दोन दिवस पाण्यांत बुडवून ठेवलं! घाडी आणले, देवपण केलं, ज्योतिषी धुंडाळले! असलेलं नसलेलं गहाण ठेवून आमोणें गांवच्या मस्तेभटाला आणून ब्राह्मण वाढले. 'शान्त' केली; पण त्या तळपाच्या भगदाडांतून पाण्याचा थेंब निघेना! आम्हीं कंटाळलों! म्हटलं हा कसला देव! मुलानं आगळीक केली आणि बापानं गय केली नाहीं असं कधीं घडलं आहे? पण वेताळ इतका कडक झाला खरा. त्या दिवसांत पांच हात उंचीच्या त्या पाषाणी मूर्तीच्या अंगांतून घामाच्या धारा निथळत होत्या! शाबा गुरव दिखील देवळांत जायला भिऊं लागला. शेवटीं आम्हीं म्हटलं 'अशानं उपयोगी नाहीं. शेवटचं देवपण करूं अन् पाणी न आलं तर देवाला इथं टाकून कुठं तरी जाऊं. असा निश्चय करून सगळे पोरथोर वेताळाच्या अंगणांत जमा झालें! तुम्हांला काय सांगणार बाबा! आम्ही तीन-चारशें लोक मनगटांनीं अश्रु पुशीत तिथं जमलों होतों. लेकुरवाळ्या बाया पोरांना धेऊन रडत होत्या. आजारी लोक दिखील घरं सोडून तिथं आले होते. शाबा गुरव पुढं झाला व सगळ्या गांवच्या वतीनं नारळ ठेवून त्यानं साष्टांग नमस्कार घातला. आम्ही सगळे पाया पडलों. घाड्यानं आधीं घाडपण केलं. सगळे लोक उभे राहिले. गुरवानं गाऱ्हाणं घातलं. वेताळाची थोरवी त्यानं रडून गायली. सगळे गांवकरी त्याला 'हय सायबा', 'हय सायबा' अशी साथ करूं लागले. घांटी वाजूं लागल्या. बाहेर महार लोक ढोल-ढोलगीं बडवूं लागले. सगळे कळवळून म्हणूं लागले, 'सर पुढं सायबा!'

सगळ्यांचीं काळजं धडधडत होतीं. जीव डोळ्यांत सांचला होता.

वेताळ कृपा करील काय ? हा सगळ्यापुढं प्रश्न होता. लोक ओरडून दमले होते, वाद्यं वाजून भागलीं होतीं. कोपऱ्यांतून एका मानायानं वैतागानं म्हटलं, "आगा पिशानो ! कसले बेताळ घेऊन बसल्यात ! बेताळ मेलों !"

हे शब्द त्याच्या तोंडून निघण्याचा अवकाश, त्या जमावांतून एक भयानक किंकाळी आमच्या कानांवर पडली ! सगळे भीतीनं थरारले, अंगावर कांटा उभा राहिला. वाद्यं थांबलीं. वेताळाचा अवसर कुणाच्या तरी अंगांत शिरला होता. आम्ही आसपास पाहूं लागलों. इतक्यांत छातीवर जोरानं हात मारीत व तोंडानं चप्प ! चप्प ! अशा आरोळ्या फोडीत एक भगत चौकावर आला. त्याचं स्वरूप आठवलं म्हणजे मला अजून दिखील भीति वाटते बघा—" इथं तो म्हातारा थांबला. कपाळाला आलेला घाम त्यानं बोटानं झाडला व विडीचा एक लांब झुरका मारून त्यानं थोड्या वेळानं म्हटलं, "वेताळाच्या अवसरानं छाती पिटून आकान्त केला. सगळे गांवकरी व बायकामुलं भिऊन गेलीं. सगळ्यांनीं त्याच्या पायांवर घालून घेतलं. शाबा गुरव त्याच्याजवळ जाऊन म्हणाला, "देवा ! तूं आम्हांला राखणार आणि तूंच मारणार ! आम्ही अज्ञान; आमच्या हातून कांहीं आगळीक घडली असल्यास ती पोटांत घाल आणि तुझं ब्रीद राख !"

वेताळानं करकर दांत चावले व डोळे गरगर फिरवीत भयानक आवाजांत विचारले, "अरे शाबा ! मी खुळा आहे रे ! मी अज्ञान. तुम्हीच शहाणे. माझ्यानं काय होतं आहे ! वेताळ मेला !"

शाबा गुरव हात जोडून व नाक जमिनीवर घासून म्हणाला, "देवा ! असं काय बोलतोस तूं ! तुझ्यानं काय होतं आहे तें आम्ही सध्यां पाहत आहों ना ! तुला अज्ञान आणि दुबळा कोण म्हणेल ? तुझ्या

शत्रूंना सप्तपाळाला जोडण्याची तुझी शक्ति! तुझा कोप सहन करून जगांत राहण्याची कोणाची प्राज्ञा!"

विकट हास्य करून वेताळानं निखाऱ्यांवर घातलेल्या धुपाचा धूर तोंडांत व नाकांत ओढीत म्हटलें, "हें तुम्हांला आतां कोणीं सांगितलं रे? 'सरत्या काळांत व्हरती बुद्ध' अशी तुमची स्थिति! तुम्ही जास्त मदांध झालांत कीं रे! तुम्हांला देवाची कसली पर्वा!"

"देवा! असं काय बोलतोस तूं? आम्ही तुझीं लेकरं! हातून चूक घडली तर ती पोटांत कोण घालील तुझ्याशिवाय? ही सगळी मठी तुझी. संकटाचे वेळीं ती तुझ्या पायापाशीं एकत्र झाली आहे. तिला धीराचा शब्द तुझ्याशिवाय कोण देणार!"

वेताळ जरा शान्त झाला. त्याचा क्रोधाचा पहिला उमाळा ओसरला. सगळ्यांची काळजी आपणांला आहे अशी मुद्रा करून त्यानें म्हटलें, "अरे शाबा! काय झालं आहे रे? कोणतं संकट आलं आहे रे?"

धुपाची चिमटी निखाऱ्यांवर टाकून हातानं वारा घालीत शाबा गुरव म्हणाला, "देवा! तुला ठाऊक नाहीं असं काय आहे? आम्ही इथं कां जमलों आहों हें तुला सांगितलं पाहिजे? गांवावर ओढवलेली आपत्ति नाहींशी व्हावी हेंच आमचं तुझ्याजवळ मागणं!"

वेताळानं छातीवर नारळ मारून म्हटलं, "पण केलेल्या आगळिकी-चा जाब मला कोण देणार? तुम्हांला पाहिजे तें तुम्ही कराल तर नको असलेलं भोगाल."

"देवा! एकदां अपराध घडला; आतां दया कर आणि उपाय सांग! तुझ्या प्रभावळींतल्या सेवकांना कांहीं मानपान केला पाहिजे तर तसं सांग; पण हें संकट निवार. तुझा गांव सोडून तुझ्या लेंकरांनीं बाहेर जावं यांत तुला कसलं भूषण?"

वेताळानें डोळ्यांतून अश्रु काढले व करुण स्वरांत म्हटलें, " अरे! याच अभिमानाकरितां मी मरतों आहे! तुम्हांला माझा अभिमान नाहीं; पण मला तुमचा आहे. तुम्हीं मला सोडलं तरी मी तुम्हांला सोडणार नाहीं."

या उद्गारांबरोबर सगळ्या गांवकऱ्यांनीं फिरून एकदा साष्टांग नमस्कार केला. वेताळ पुढें म्हणाला, " अरे! माझी अवकृपा झाली तर इथून तुम्ही दुसरीकडे गेलां तर सुखी व्हाल असं तुम्हांला वाटतं?"

" तुझी अवकृपा झाली तर कोण सुखी होईल देवा! सगळ्या जगावर तुझी सत्ता. तुला सोडून आम्ही दुसरीकडे कुठं जाणार?"

" मग, काय आहे तुमचं म्हणणं?" वेताळ 'सूं' करीत व फूत्कार टाकीत म्हणाला.

" आमचं म्हणणं काय असणार? गांवाला फिरून पाणी मिळावं हेंच आमचं म्हणणं."

" माझी प्रभावळ तुमच्यावर कोपली आहे. तुम्हीं तिला शान्त केलं पाहिजे."

" तिचा कोप शान्त व्हायला आम्हीं गांवकऱ्यांनीं काय केलं पाहिजे?"

" तुम्हांला एक दिव्य करावं लागेल." वेताळानं गंभीर स्वरांत छातीवर नारळ मारीत म्हटलं.

" देवा! कसलं दिव्य केलं पाहिजे आम्हीं? तुझ्या कृपेची सावली मिळवण्याकरितां आम्ही कांहींहि करूं."

" पुढच्या एकादशीपर्यंत दोन—" असें म्हणून अवसरानें हातानें खूण करून दाखवीत म्हटलें—" त्या तिकडे अर्पण करा."

वेताळाचं म्हणणं आम्हां गांवकऱ्यांना लवकरच समजलं. दोन मुलांचा बळी दिला पाहिजे असं त्यानं सांगितलं होतं. आम्हांला हें

समजतांच फार दुःख झालं. आम्ही स्वतः मरायला तयार होऊं, पण मुलांचा बळी कोण देणार ?

अवसर जास्त वेळ राहिला नाहीं. त्यानं तीर्थ घेतलं व तो धाडकन् जमिनीवर किंकाळी मारून पडला.

अवसराचे शेवटचे उद्‌गार ऐकून शाबा गुरव ढळढळां रडला. शाबा म्हणजे सगळ्या गांवचा प्राण. मुलाच्या मरणामुळं दुःखी असूनहि सगळ्या गांवकऱ्यांची काळजी. गांवांत कोणी आजारी पडला तर शाबा औषधांचा बटवा व वेताळाचा अंगारा घेऊन त्याच्या घरीं तयार. कुणाला भुतानं पछाडलं, "आळवंतीण" बाधली, मुंजो बसला तर वेताळाच्या बेंबीपासून गाऱ्हाणं घालून किंवा प्रसाद लावून, त्याला गुण द्यावयाचा शाबानंच ! त्याची पुण्याई मोठी म्हणून वेताळाचा अवसर त्याच्याबरोबर दोन-दोन तास बोलत बसे ! शाबा गुरवाचा आम्हांला केवढा धीर ! गांवच्या बऱ्याकरितां शाबा गुरवानं सोसलेल्या त्रासांची आठवण झाली म्हणजे ऊर अगदीं भरून येतो, बघा !

तेव्हां सांगायला काय गेलों होतों तर शाबाचं हृदय वेताळाचे शब्द ऐकून कळवळलं. अवसर गेल्यानंतर सगळे गांवकरी त्याच्याभोंवतीं जमा झाले. देवाला बळी द्यायचे ते कुणी, हा प्रश्न प्रत्येक गांव-कऱ्याला भयंकर वाटला. पण शाबानं धीर देऊन सगळ्यांना घरीं पाठवलं.

आठ-दहा दिवस निघून गेले. पण बळी द्यायला कुणीच तयार होईना. शाबानं हे दिवस मोठ्या चिंतेंत वेताळाच्या सान्निध्यांत बसून काढले. एका रात्रीं शाबाला वेताळ स्वप्नांत दिसला व त्यानं म्हटलं, "मीं सांगितलेलं काम तूं पार पाड !"

दुसऱ्या दिवशीं त्याची विधवा सून, आपल्या दोघां सहा-सात वर्षांच्या मुलांना त्याच्यापाशीं ठेवून शेजारच्या गांवात आपल्या माहेरीं एका दिवसाकरितां गेली. दोन्ही मुलं शाबाच्या ताब्यांत राहिलीं. त्यानं विचार केला, आपण म्हातारे झालेलों. मुलगा वारल्यामुळं वृत्ति विरागी बनलेली. त्यांत आणखी वेताळाचा साक्षात्कार होऊन त्यानं आपल्यावर ही कामगिरी सोपवली. मग सगळा गांव जर सुखी होतो आहे तर आपल्या कुटुंबाचा नाश झालेला काय वाईट? तापाच्या साथीनं लोक काय कमी मरतात? आपलीं नातवंडं मोठीं होतील याचा काय भरंवसा? आणि वेताळाचा साक्षात्कार केवढ्या किंमतीचा! वेताळाची आज्ञा पाळली नाहीं तर काय गत होईल आमची?

रात्र झाली. बारा वाजले. अशा वेळीं शाबा गुरवानं सगळ्यांच्या सुखाकरितां ती भयंकर कामगिरी पार पाडली! आणि काय आश्चर्य! पहाटेला आम्ही उठून पाहतों तों सगळीकडे पाणीच पाणी! गांवांत कोण आनंद उडाला! आम्ही सगळे गांवकरी धावतच देवळाकडे गेलों. झरा पूर्वीपेक्षांहि मोठा निघत होता! सगळेजण देवळांत गेलें. पण तिथं काय पाहणार! शाबा गुरव मान खालीं घालून देवाच्यापुढं अश्रु गाळीत बसला होता! सगळ्यांना आश्चर्य वाटलं! गुरव सगळ्यापेक्षां जास्त आनंदित दिसावयाचा; पण तो इतका दुःखी कां? असा आम्हांला प्रश्न पडला. सगळ्यांच्या उत्साहावर विरजण पडलं. थोडयाच वेळांत जवळच देवळाच्या मागं झऱ्याच्या शेजारीं गुरवांच्या नातवांचीं दोन प्रेतं सांपडलीं! आम्ही सगळे रडलें! गुरवाचा त्याग पाहून अचंबा वाटला!

या गडबडींत गुरवाची विधवा सून आपल्या मुलांना शोधीत आकान्तानं देवळांत आली. सगळ्यांना कळून चुकलं, कीं गुरवानं

आपल्या नातवांचे बळी दिले! त्याच्या सुनेनं वेताळापुढं लोटांगण घालून म्हटलं, "वेताळा, माझीं पोरं कुठं ठेवलींस?"

मुलांचीं प्रेतं नजरेला पडतांच तिनं केलेला आक्रोश काय सांगणार? सगळयांचीं तोंडं सुकलीं! वाटलं, हें पाहण्यापेक्षां पाणी नव्हतं तेंच बरं होतं! तिनं हृदय पिळवटल्याप्रमाणं शाबा गुरवाला शाप देऊन म्हटलं, "तूं किडे पडून मरशील!" आणि गांवकऱ्यांना तिनं शाप दिला, "या पाण्यानं वाढलेलं अन्न खाल तर रक्त ओकून मराल!" सगळे गांवकरी तिच्या पायां पडले. लोकांचा तिला कळवळा आला व तिनं म्हटलं, "आजचा दिवस तुम्ही अन्न घ्याल तर तडफडत मराल!"

आणि तेव्हांपासून सगळा गांव वर्षाचा तो दिवस पाळीत आहे! आज या गांवांत कोणीच अन्न घेत नाहीं. गुरव जास्त दिवस वांचला नाहीं! सुनेच्या शापानं तो हाल हाल होऊन वारला! पण त्याची स्मृति झाली, कीं आमच्या मनांत दुःखाचं भरतं लोटतं. त्याच्या पुण्यकृत्यामुळं आज इथं हें पाणी दिसत आहे व सगळा गांव सुखी आहे!"

इतकें म्हणून त्यानें भक्तिभावानें दोन्ही हात जोडले. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले होते. त्याचा गळा दाटून आला होता; मींहि न कळत त्याचेंच अनुकरण केलें आणि शाबा गुरवाच्या पुण्यस्मृतीला वंदन करीत मी तेथून घरीं परतलों.

---

# मेणाचीं बाहुलीं

माझ्या आयुष्यांत क्रान्ति घडवून आणणारा तो करुण प्रसंग! त्याचा मला विसर पडणें कधीं तरी शक्य आहे का?

सत्तरी हा गोमंतकांतील एक मागसलेला तालुका आहे. तेथेंच मी एका शिक्षणसंस्थेच्या वाढदिवसानिमित्त व्याख्यान देण्याकरितां चाललों होतों. मोटार लॅरींत बरेच प्रवासी होते. सगळेच अनोळखी. तरुण-म्हातारे, अशिक्षित-सुशिक्षित, दरिद्री-सुखवस्तु; सगळ्याच प्रकारचे लोक होते. प्रवासांत संभाषणासारखा करमणुकीचा कोणता विषय असणार? सगळेच बोलत होते. पण बोलण्याचा विषय मात्र एकच. लोकांचें दारिद्र्य, सरकारची अरेरावी, पुढाऱ्यांचें औदासीन्य इत्यादि.

'कला आणि जीवन' हा माझ्या व्याख्यानाचा विषय होता. त्यांतील मुद्द्यांसंबंधीं विचार करीत मी निर्विकारपणानें माझ्या प्रवासी सोबत्यांचें भाषण ऐकत होतों. नेहमींच्या सुखसोई बाजूला सारून

ज्ञानदानाचें कार्य करण्यासाठीं मी इतक्या दूर येत आहें अशीच माझी समजूत होती. नियतकालिकांतून अधूनमधून लेखन करणें, प्रसंगवशात् लहान-सहान संस्थांच्या समारंभांना उपस्थित राहून लोकांना उपदेश करणें हें फार मोठें देशकार्य आहे अशाच धुंदींत मी होतों. शहरांत नेहमींच राहिल्यामुळें लोकांची खरी स्थिति आमच्या दृष्टीला कुठें पडणार? आणि ते हालअपेष्टा काढीत आहेत असें कळलें तरी आमच्या दृष्टीनें या प्रश्नाला कोणतेंच महत्त्व नव्हतें.

माझ्या प्रवासी सोबत्यांचें संभाषण रंगांत आलें होतें. कांहीं वेळा-नंतर माझें लक्ष तिकडे वळलें. एक कुळवाडी दुसऱ्याला म्हणत होता. "दादा, यापुढं आपल्याला गोव्यांत राहणं अशक्य आहे! रुपयाला अडीच पायल्या तांदूळ पूर्वीं मिळत असे, तो आतां रुपयाला एक पायली देखील मिळत नाहीं. तांदूळ वाढला म्हणून मजुरी कांहीं वाढली नाहीं. मग आमच्यासारख्यांनीं जगायचं कसं? वाडवडिलांनीं बांधलेल्या घरादारावर तुळशीपत्र ठेवून इंग्रजी हद्दींत जाऊन राहिल्या-शिवाय आतां गत्यंतर नाहीं."

"आणि या दिवसांत तेंच तर हद्दीवरचे गरीब लोक करीत आहेत. पण सरकारला त्याचं काय? मूठभर श्रीमंत जमीनदारांना मदत मिळावी म्हणून सरकारनं तांदळाची नेहमींची आयात बंद केली अन् तिच्यावर कर लादला. पण त्यामुळं असंख्य लोकांचे हाल होत आहेत तिकडे कुणाचंहि लक्ष जात नाहीं." दुसरा प्रवासी म्हणाला.

"असल्या गोष्टीकडे लक्ष पुरवायला आमच्यांत पुढारी तरी कुठं आहेत? लोक उपाशी किंवा अर्धपोटी राहून दिवस कंठीत आहेत, नारळाचा दर घटला आहे, लोकांच्या उत्पन्नाच्या बाजू संपुष्टांत आल्या

आहेत, आशेला कुठंच जागा नाहीं, अशा स्थितींत आमचे पुढारी कोण व ते कुठं आहेत, हें कुणाला माहीत!"

"कुठं आहेत आम्हांला पुढारी? दुर्दैवी देशाला पुढारी नसतात. एरव्हीं सगळेच पुढारी! पण प्रसंग पडला तर पुढारी कोणीच नाहीं. सूटबूट घालून फिरंगी भाषा बोलण्यांत आमच्या पुढाऱ्यांना सार्थक वाटतं. हे कसले पुढारी! स्वार्थसाधु, दुबळे, सरकारी नोकर का कधीं पुढारी होऊं शकतात? ते आपलं स्वतःचं हित पाहणार, कीं लोकांचं? नाहीं तर शेजारच्या हिंदुस्थानाकडे पहा. देशासाठीं हालअपेष्टा सोसणारे महात्मे आपण तिथं पाहतों. धन्य ते लोक!" एका पांढरपेशा प्रवाशानें संभाषणांत भाग घेतला.

हळूहळू माझी उत्सुकता वाढूं लागली. 'कला आणि जीवन' या संबंधींचे माझे विचार जेथल्या तेथें विरून गेले. औटघटकेच्या माझ्या त्या सोबत्यांच्या शब्दांतील आवेश पाहून मला कुठें तरी दुखल्यासारखें झालें.

"पुढारी नाहींत म्हणून का नशिबांतलं जगणं टळतं आहे! कांहीं तरी धडपड केलीच पाहिजे. सरकारच्या कानांवर आमची स्थिति घालवी म्हणून गेल्या रविवारीं दीड-दोन हजार रयत पायीं चालत पणजीला गेली असं ऐकलं; त्याचं पुढं काय झालं कळत नाहीं."

"काय व्हायचं? जमावाच्या पुढाऱ्यांना पोलिसांनीं पकडलं व कांहीं दिवस तुरुंगांत डांबून ठेवलं. कित्येकांना तर मार देखील दिला. ही बातमी नाहीं का कळली तुम्हांला?"

"दुर्दैव आपलं!"

मोटार गांवांत पावली. मला उतरून घेण्यासाठीं कांहीं गृहस्थ मोटार-स्टँडवर आले होते. त्यांपैकीं एकटा माझ्या ओळखीचा होता.

त्यानें इतरांशीं माझी ओळख करून दिली. शहरांतला सुशिक्षित माणूस आणि त्यांतल्या त्यांत सुप्रसिद्ध लेखक, या नात्यानें प्रत्येकजण माझ्याकडे आदरानें वागला. माझ्या आगमनानें मी आपल्यावर फार मोठे उपकार करीत आहे अशीच त्या मंडळींची समजूत झालेली दिसली. ती पाहून मी मनांतल्या मनांत बराच फुगून गेलों. माझ्या या उत्साहांत मिठाचा खडा टाकणारी आतांपर्यंत एकच गोष्ट घडली होती. ती म्हणजे सर्वसाधारण जनतेचें पुढाऱ्यांबद्दलचें मत कळवून देणारें मोटारींतील संभाषण.

स्थानिक कार्यकर्त्यांबरोबर आम्ही शाळेच्या इमारतीत गेलों. समारंभाला अजून तास-दीड तास अवकाश होता. म्हणून शाळेच्या एका खोलींत माझी बसण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. थोड्या वेळानें तेथें साठ-सत्तर वर्षांचा एक म्हातारा आला. त्याच्यावर नजर पडतांच मी खुर्चीतच जरा हललों. त्यानें हसण्याचा प्रयत्न करून मनमोकळेपणानें मला बसायचा आग्रह केला.

माझ्या मित्रानें त्याच्याशीं माझी ओळख करून दिली. उज्ज्वल आयुष्यक्रम असलेला तो एक दरिद्री म्हातारा होता, आणि त्याचें दारिद्य जन्मजात नव्हतें, हें त्याच्या मुद्रेवरून कळून यायला मला उशीर लागला नाहीं. त्याच्या माथ्याला जुनाट तांबडा फेटा होता. अंगांत काळा फाटका कोट होता. त्याची उंची असाधारण होती. वार्धक्यामुळें चेहऱ्याचीं हाडें स्पष्ट दिसत होतीं. डोळे खोल गेले होते. चेहऱ्यावर असंख्य सुरकुत्या पडल्या होत्या. अवयव ठसठशीत होते, आणि त्यांच्यावर त्याच्या बंडखोर व्यक्तित्वाचा ठसा उमटला होता.

माझ्या शेजारीं बसून घेतल्यानंतर तो पुन्हा हसला. तें हास्य पाहून मी दबून गेलों. त्यांत त्वेष होता, तिरस्कार होता, उपहास होता,

कारुण्य होतें. एकान्तिक भावनांनीं भरलेलें तें विशुद्ध हास्य पाहून मीं घाबरून गेलें. एका अलौकिक मूर्तिकारानें काळपुरुषाची जणूं काय दगडी मूर्तीच घडवली आहे, खोट्या कल्पनांनीं आतांपर्यंत पोसलेला माझा मोठेपणा हद्दरत आहे असें मला वाटलें.

व्याख्यानाची वेळ झाली. सुरुवातीचे ठराविक विधि पार पडले. अध्यक्षांनीं गौरवपर शब्दांत सभेला माझा परिचय करून दिला. टाळ्यांचा कडकडाट झाला. मी उभा राहिलों. श्रोतृसमुदायावरून मीं नजर फिरवली. लोकांचे चेहरे उत्सुकतेनें भरलेले होते; पण चेहऱ्यांवर उदासीनता कांहीं कमी नव्हती. पाण्याचें शिंपणें नसलेल्या वनस्पतीच जणूं कांहीं. अकस्मात् मला मोटारींतील संवादाची आठवण झाली.

मीं व्याख्यानाला सुरुवात केली असेल नसेल. माझी नजर दूर कोपऱ्यांत एका खांबाला टेकून बसलेल्या मघांच्या म्हाताऱ्यावर गेली. गळ्यांतून निघणारे शब्द कुणी तरी मागें लोटीत आहे असा मला भास झाला. मोठ्या प्रयासानें मी बोलूं लागलें. माझ्या शब्दांत जीव नव्हता. माझ्यावर एकाग्रतेनें खिळलेल्या शेंकडों डोळ्यांची मला कदर नव्हती. पण दादोजी राण्याचे ते डोळे माझें मन कोरीत आहेत असें मला वाटूं लागलें. त्याच्या भयाण उदात्त मुद्रेवरील भावांत मला माझ्या व्याख्यानावरील, माझ्या आयुष्यावरील विदारक टीका दिसूं लागली. मी जीवनासंबंधीं बोलूं लागलों तेव्हां त्याचे डोळे कारुण्यानें भरले व लगेच तेथें त्वेषाची चमक दिसूं लागली. मीं कलेसंबंधीं विवेचन सुरू केलें तेव्हां एखाद्या मूर्खाच्या पोरकटपणाकडे आपण क्षुद्र बुद्धीनें पाहावें, त्याप्रमाणें अपरिमित तुच्छतेनें माझ्याकडे पाहत आहे असें मला दिसलें. ज्यांचें जीवन तीव्रतर दुःखानें होरपळून निघत आहे अशा त्या भोळ्या-भाबड्या

खेडवळ श्रोत्यांपुढें मी कलेची शुष्क चर्चा करूं लागलें तेव्हां त्यानें आपले डोळे जमिनीकडे लावले हें पाहून शरमेनें मी माझी मान खालीं घालून बोलूं लागलों.

एकदांचें व्याख्यान आटोपलें. मला तें एक दिव्यच वाटलें. एकच भपका, एकच दिखाऊपणा सगळीकडे चालला होता. लोकांना जें पाहिजे आहे तें आम्हांपाशीं नव्हतें. निर्जीव, निःसत्त्व, क्षुद्र अन् नाटकी तेवढें आम्ही लोकांना देत होतों आणि त्यांतच धन्यता मानीत होतों. जीवनाचा अर्थ आम्हांला कळत नव्हता, पण तो लोकांना सांगण्याचा अट्टाहास मात्र आम्ही करीत होतों.

लोक घरोघर निघून गेले. मला सगळीकडे शून्य दिसूं लागलें, पण त्या शून्यांतच मला वेगळ्या प्रकाशाची लकेर दिसूं लागली. किती उत्साहानें मी घरांतून बाहेर पडलों होतों ! समाजसेवकाची भूमिका हां-हां म्हणतां माझ्या नजरेसमोरून नाहींशी झाली होती.

मी उठलों. माझ्याभोंवतीं कांहीं पांढरपेशी मंडळी जमा झाली. मी अगदीं दमून गेलों होतों. एका दिवशीं दोन-तीन व्याख्यानें देऊनहि मीं कधीं इतका दमलों नसेन; माझ्या त्रासाचें कारण, व्याख्यान किंवा प्रवास नव्हता. मनाच्या टोचणीमुळें, आंतरिक तळमळीमुळें मला यातना होत होत्या.

गर्दीतून वाट काढीत दादोजी राणा माझ्या जवळ आला. ती रात्र आपल्याकडे घालवावी, अशी त्यानें इच्छा प्रदर्शित केली. मंडळींच्या संमतीनें मीं तिला मान्यता दिली.

आम्हीं चालूं लागलों. संध्याकाळ झाली होती. आगामी अंधाराच्या सावल्या सगळीकडे पसरल्या होत्या. आपल्या हातांतील उंच जाडजूड दांडा जमिनीवर आपटीत तो वाकलेला म्हातारा लांब टांगा टाकीत

पुढें चालला होता. उजव्या बाजूच्या टेकडीवर एका प्रचंड तटाचे ढासळलेले बुरूज दिसत होते. माझा उंची युरोपियन पोषाक, माझी कृत्रिम शहरी चाल, माझें दुबळें शरीर आणि त्याचा जुनाट साधा पोषाक, त्याची लांब-रुंद अंगकाठी पाहिल्यानंतर मला वाटलें कीं, मी म्हणजे त्याच्या मागोमाग जाणारें एक बाहुलें!...... आणि आजच्या व्याख्यानाचा विषय 'कला आणि जीवन!' काय विचित्र योगायोग पहा.

आम्ही एका पडक्या वाड्याकडे आलों. बाहेरच्या बाल्कनीला छप्पर नव्हतें. चार कोपऱ्यांत चार दगडी खांब तेवढे उभे होते. मस्तक नसलेल्या देहासारखें तें दृश्य मला भयाण दिसलें. घराच्या भिंती दगडी होत्या; पण त्या आतां अगदीं काळवंडलेल्या दिसत होत्या. आसपास पसरत जाणारा अर्धवट अंधार, तो पुराण-पुरुष, आंतलें दैन्य उघड्यावर टाकणारें तें घर! माझ्या मनांत एक विचित्र हुरहुर उत्पन्न झाली. गाढ दुःखानें मन भारावून गेलें......सगळीं रात्र तेथें काढावयाची होती......पुढें कोणतें ताट वाढून ठेवलें आहे त्याची कल्पना होईना.

आम्हीं घरांत शिरलों. कालचक्रामुळें येणाऱ्या दैन्याचा ठसा घरांत सगळीकडे उमटला होता. त्या वातावरणांत भरून राहिलेली उदासी-नता जणूं काय माझ्या अवयवांत शिरत होती. घरांत कांहीं मंडळी दिसली, पण जिवंत आनंदी माणसांच्या वास्तव्याची खूण तेथें दिसली नाहीं. इकडून तिकडे कांहीं मुलें फिरकलेलीं दिसलीं—पण आई हरवलेल्या चिमण्या पांखरांप्रमाणें मुकीं, शान्त, मृतवत्......

राणा माझ्याशीं बराच वेळ बोलला. पण त्या बोलण्यांत जीव नव्हता. तें बोलणें मला औपचारिक वाटलें. म्हाताऱ्याच्या मनांत

कोणती तरी खळबळ चालली होती हें निश्चित; पण त्याच्या शब्दांतून ती अजून व्यक्त झाली नाहीं.

जेवणाची वेळ झाली. मुद्दाम आमंत्रण करून दादोजीनें मला आपल्याकडे बोलावलें होतें. शहरच्या वक्त्यांना आणि त्यांतल्या त्यांत सुटाबुटांत असलेल्यांना खेडयांतील लोक केवढ्या बडदास्तीनें वागवतात हें मला पूर्वी अनुभवानें माहीत होतें. त्यामुळें त्यांच्याकडे जेवणाचा वेगळाच थाट असेल अशी माझी कल्पना होती.

हातपाय धुऊन आम्ही माजघरांत आलों. मध्येंच एक समई शान्त, मंद प्रकाशानें जळत होती. सात-आठ पानें मांडलीं होतीं. वरच्या पानावर मला बसवण्यांत आलें. दुसऱ्या पानावर दादोजी बसला आणि नंतर घरचीं मुलें बसलीं.

एक पोक्त विधवा बाई एक लहानशी थाली घेऊन बाहेर आली. तिनें माझ्या ताटांत भात वाढला. आमटीची वाटी आणून जवळ ठेवली. भाजी वाढली. एवढें झाल्यानंतर दादोजी म्हणाला, "तुम्ही सुरुवात करा."

"नाहीं, आपण बरोबरच जेवूं."

"तसं नको. आम्ही पेज जेवणार." आणि हे चार शब्द बोलतांना दादोजीच्या मुद्रेवर जी विकारांची खळबळ दिसली, ती पाहून मी हतबुद्धच झालों.

"म्हणजे? तुम्हीं कां नाहीं भात जेवीत?" मी विचारून गेलों. मी भात जेवत असतांना इतरांनीं पेज जेवावी हें माझ्या मनाला लागलें.

"आज दुपारीं आमच्याकडे पोळीचं जेवण होतं. म्हणून आम्हां

सगळ्यांना पेज घालायला सांगितली." दादोजी म्हणाला. मुलांनीं एकमेकांकडे पाहिलें.

वाढणाऱ्या बाईनें दुसऱ्या मोठ्या थालींतून पेज आणून ती सगळ्यांच्या पितळ्यांत ओतली. पेज अगदीं पातळ होती. पेजेचें पाणीच जणूं. अधूनमधून भाताचे गोटे असतील तेवढेच.

मी जेवूं लागलें. मुलांबाळांनीं पेजेचें पाणी घटाघट प्यायला सुरुवात केली. निरनिराळ्या शंकांनीं माझें मन व्यापून टाकलें होतें. घडणारा एकेक प्रकार अनपेक्षित होता. घरचें दैन्य, केविलवाण्या चेहऱ्यांचीं तीं मुलें, ती पातळ पेज, अन् ती पितांना मुलांची दिसून आलेली अधीरता हें सगळें पाहून माझें मन अगदीं कावरें-बावरें झालें.

चार घास पोटांत घालून मीं जेवण आटोपलें. दादोजीनें जेवतांना केलेलें समर्थन मला पटलें नाहीं.

आम्हीं खोलींत आलों. दादोजीशीं काय बोलावें तेंच मला सुचेना. ही व्यक्ति म्हणजे एक भीषण गूढ आहे एवढेंच मला दिसून आलें.

तो माझ्यापाशीं आला आणि सद्गदित अंतःकरणानें म्हणाला, " सरदेसाई, मला क्षमा करा. मी तुम्हांला खोटं सांगितलं."

वरील शब्द ऐकून माझ्या हृदयांत कुणी तरी सुरी खुपशीत आहे असें मला वाटलें.

" मग खरी हकीगत सांगा ना मला!" मीं भीत भीत विनंति केली.

" सांगायचं काय शिल्लक राहिलं आहे आतां? जीव जगला पाहिजे म्हणून आम्हीं पेज पिऊन दिवस कंठीत आहों!" इतकें बोलून दादोजी स्तब्ध राहिला. त्याच्या मनांत चाललेल्या वादळाची मला कल्पना आली.

खोलींत माझी झोपण्याची व्यवस्था करून दादोजीनें माझा निरोप घेतला.

मी अंथरुणावर तळमळत पडलों. सगळया गोष्टी नजरेसमोर नाचूं लागल्या. दिवा मालवून अंधार केला पण झोप लागण्याचें चिन्ह दिसेना. किती तरी वेळ विचारांतच निघून गेला. माझ्या व्यक्तित्वा-वर चारी बाजूंनीं प्रहार होत आहेत असें वाटूं लागलें. जीव अगदीं हैराण झाला अन् या शिणांतच मला तंद्री लागली.

केवढा वेळ अशा स्थितींत गेला तें कांहीं कळलें नाहीं. पण बऱ्याच वेळानंतर कुणी तरी दार उघडल्याचा आवाज ऐकूं आला. मीं डोळे उघडून पाहिलें. दादोजी राणा आंत येत असल्याचें दिसलें. त्याचें स्वरूप आतां सर्वस्वीं पालटलें होतें. चेहऱ्यावर जास्त उदात्तता पसरली होती.

तो जवळच्या खुर्चीवर बसला. मी दचकून गेलें. त्यानें मला धीर दिला.

" मला क्षमा करा... " मीं म्हटलें.

" कसली क्षमा मागतां तुम्ही? "

" तुमचं दैन्य पाहण्याचा प्रसंग... "

" माझं दैन्य तुम्हीं उघड्या डोळ्यांनीं पाहावं अशीच माझी इच्छा होती. अन् तें लपवावं असं लज्जास्पद तरी त्यांत काय आहे? घरोघर तुम्हांला हेंच दैन्य आढळून येईल. तुमच्यासाठीं कदाचित् मेजवानी केलेली आढळेल; पण ती भांडींकुंडीं गहाण ठेवून! घरांत मुलंबाळं नेहमीं पेजेच्या पाण्यावरच जगत असतील."

" पण अशी स्थिति... " मीं भीत भीत विचारलें.

" आमच्याच कर्मानं अशी स्थिति आली आहे. गेल्या वर्षीं आठ
रुपये तांदळाचा गोण होता. आज सोळा रुपये झाला आहे. याला
कारण आम्हीच नाहीं का? तांदूळ महाग कुणीं केला? सरकारनं ना?
पण आम्हीं काय केलं? शान्त राहिलों. हजारों गरीब अडाणी लोक
रणजीला गेले. सरकारनं काय केलं? त्यांना कैदेंत टाकलं, मारहाण
केली; असं कां झालं? तांदळाचा गोटा गरिबांना मिळण्याची मुष्कील
झाली आहे आज. नारळाचा दर हजारीं दहा रुपयांवर उतरला आहे
तो चढण्याची खटपट होत नाहीं. मग लोकांच्यापाशीं इतका महाग
तांदूळ विकत घ्यायला पैसा कुठून येईल? उद्योग-धंदे नाहींत; लोक
गरीब, श्रीमंत जमीनदार व्याजबट्ट्याचा व्यापार करण्यांत गुंतले आहेत,
सरकार उद्योगधंद्यांकडे लक्ष देत नाहीं. मिळून सगळीकडे दारिद्र्य!
तुम्ही शहरचे लोक व्याख्यानं देऊन जातां, लेख लिहितां, गोष्टी
लिहितां, आम्ही व्याख्यानं ऐकतों व लेख वाचतों. पण आमच्या
पोरांना त्यामुळं घासभर भात कांहीं मिळत नाहीं! कशाला तुमचीं तीं
व्याख्यानं अन् तुमचं साहित्य? तुम्ही सुशिक्षित अवसानघात करून
अंधारांत लपून बसतां म्हणून खेडवळ लोक हजारोंनीं त्या दिवशीं
रणजीला गेला. आपण अन्नाला मोताद झालों आहों हें सरकारला
कळवावं हा त्यांचा हेतु होता. ते काय बंडाचं निशाण उभारून गेले
होते? पण परिणाम काय झाला? बुटासुटांत नसलेल्या, फिरंगी भास
न येणाऱ्या अन् खादीचा पोषाक वापरणाऱ्या खेडवळ पुढाऱ्यांना
पोलिसांत नेऊन चोप देण्यांत आला! अन् तुम्ही सगळे स्वस्थ! पाहुणे,
तुम्ही वाईट वाटूं देऊं नका. मी तुम्हांला नाहीं बोलत. पण राहवत
नाहीं बोलल्याशिवाय. हें सगळं आठवलं म्हणजे मनाची आग
होते बघा, रयतेच्या पुढाऱ्याला चोप पडला असं कानांवर पडलं

त्या वेळीं असं वाटलं कीं, या म्हातारपणांत फिरून बंडाचं निशाण उभारावं अन् गांवागांवांत शिंग फुंकीत हजारों खेडवळ जमा करावे अन् आम्हांला पोटभर अन्न मिळतं कीं नाहीं तें पाहावं. दोनदां बंडाचं पुढारीपण पत्करलं. दुसऱ्या बंडांत मुलगा कामाला आला. कांहीं काल हालअपेष्टा काढल्या. कां ? रयत सुखी व्हावी म्हणून. सरकारनं राण्याचे सर्व हक्क हिरावून घेतले. लोक राण्यांचे अन् राणे लोकांचे ही इथं स्थिति होती. आम्हांला वाईट वाटलं. लहान-मोठे सत्तर गांव एक झाले. बंडाचं निशाण उभारलं. सरकारच्या लोकांना 'त्राहि' करून सोडलं. आमच्याच लोकांनीं विश्वासघात केला. आम्ही हरलों. परक्याच्या पोराला माय आपलं दूध कसं देईल ? तुम्ही इतकं शिकला, फिरंगी बोलायला लागला आणि काय केलं ? खरं ज्ञान नाहीं झालं. माणुसकीला मुकलात. अडाणी असता तर अन्याय पाहून संतापला असता. कांहीं तरी प्रतिकार केला असता. पण चार घास खायला मिळतात ना सुखानं ! तुम्हांला वाटतं सगळी जनता सुखी आहे. एखादी शिक्षण-संस्था किंवा वाचनालय चालवलं म्हणजे तुम्हांला वाटतं, आपण देशसेवा केली. कसली कपाळकरंटी ही देशसेवा ! मासिकांतून चार लेख किंवा गोष्टी लिहिल्या किंवा एक-दोन पुस्तकं छापून काढलीं म्हणजे तुम्हांला मनापासून असं वाटतं, कीं आपण फार मोठं साहित्यकार्य अन् समाजकार्य करीत आहों. कसलं किळसवाणं तुमचं समाजकार्य ! लोक सुखी होतील, त्यांना भरपूर अन्नवस्त्र मिळेल, त्यांच्यांत शान्ति, पुष्टि, तुष्टि नांदेल असं करतां येईल का तुमच्या शिक्षणाला ? मेणाचीं बाहुलीं बनवणारं तुमचं शिक्षण. माणुसकी नष्ट करणारं, पारतंत्र्याची आवड उत्पन्न करणारं, लोकां-कडे पाठ फिरवायला लावणारं तुमचं शिक्षण. आणखी इतकंहि

असून तुम्ही पुढारी म्हणवतां ! लोकांची सेवा करतां येत नाहीं तर नका करूं. पण निदान स्वतःची व इतरांची फसवणूक तरी नका करूं. लोकांची आपण सेवा करतों ही भावना अगदीं टाकून द्या. लोक उपाशी आहेत हें आधीं समजून घ्या. त्यांना अन्न मिळवून दिल्या-शिवाय आपण भरपूर अन्न घेणार नाहीं अशी प्रतिज्ञा करा."

म्हाताऱ्याला श्वास लागला. त्याच्या आवाजांत धार होती; कंप होता. एक तेजस्वी ज्योतीच वाऱ्याच्या झोतानं हलत आहे असं मला वाटलं.

तो कांहीं वेळ थांबला. त्याचा त्वेष, आवेश मावळून गेला. अगदीं करुण, असहाय स्वरांत त्यानें म्हटलें. "या गुणी पोरांना पेजेचं पाणी पितांना पाहवत नाहीं बघा..." आणि इतकं बोलून मान खालीं घालून तो स्फुंदूं लागला.

हें दृश्य मला असह्य झालं. मीं एकदम ओरडून जागा झालों.

कांपऱ्या हातानें काडी ओढून मीं दिवा लावला. आसपास पाहिलें. कुणीहि दिसलें नाहीं. खुर्ची रिकामीच होती. माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला.

इतक्यांत कोंबड्याची साद दुरून माझ्या कानांवर पडली. थोड्या वेळानें दुसरा कोंबडा आरवला. लवकरच पांच-दहा कोंबडे आळी-पाळीनें साद घालूं लागले.

मीं खिडक्या उघडल्या. पहाटेचा गार वारा आंत आला. कोंबड्यांचें आरवणें आतां अधिक जोरानें कानांवर येऊं लागलें.

पहाट झाली. दिशा उजळल्या. मी बाहेर येऊन बसलों. मनांतील भीति पार नाहींशी झाली. नव्या आशेनें मन भरून गेलें.